


# अनुराधाबाईंच्या विभूती- चमत्कारामुळे अंधश्रद्धा निर्मूलनवादाची इतिश्री

## अनुराधाबाईंच्या विभूती - चमत्कारामुळे अंधश्रद्धा निर्मूलनवादाची इतिश्री

### प्रकरण २



अलीकडे अंधश्रद्धा निर्मूलनासंबंधी इतके ऐकावयास में नाचावयास मिळते, की ते पाहून मानवी समाजाच्या गेल्या दोन हजार वर्षांच्या इतिहासात आताच अंधश्रद्धा एकदम निर्माण झाल्या आहेत की काय असा दाट संशय येऊ लागतो. विज्ञानाच्या प्रसाराबरोबर अंधश्रद्धा आपोआपच कमी होतात, अशी आमची समजूत होती. पण अंधश्रद्धा निर्मूलन समिती स्थापन करणाऱ्यांनी आमची ही समजूत साफ खोटी ठरवली आहे. त्यांच्या चळवळीमुळे अंधश्रद्धा व विज्ञानाचा प्रसार यांचा संबंध व्यस्त असावा असे वाटू लागले आहे. विज्ञानाचा जसजसा जास्त प्रसार होईल, तसतशा जातात असे दिसते किंवा पूर्वीही अंधश्रद्धा होत्या, पण अंधश्रद्धा निर्मूलन समिती स्थापणाऱ्या हल्लीच्या लोकांइतकी पूर्वीच्या लोकांना अंधश्रद्धा वाईट हे कळण्याची अक्कल नव्हती असे तरी मानावे लागते नाहीतर अंधश्रद्धा निर्मूलन समिती स्थापण्याची साधी बुद्धी त्यांना होऊ नये, याचा अर्थ काय करायचा? ते काही असो, या लोकांनी अंधश्रद्धा निर्मूलन समिती स्थापन केल्यामुळे आता अंधश्रद्धा लवकर संपुष्टात येणार, त्यांचे निर्मूलन होणार असे समजावयास हरकत नाही.

या लोकांनी अंधश्रद्धा निर्मूलन समितीची स्थापना करण्यास कोणाचा विरोध असण्याचे कारण नाही. त्यांनी हव्या तितक्या दिंड्या, यात्रा काढण्यास किंवा मेळावे

वगैरे घेण्यासही कोणाचा विरोध असण्याचे कारण नाही. पण हे सर्व करत असताना त्यांनी विज्ञानवादी दृष्टिकोन बाळगावा, अशी अपेक्षा करणे वावगे ठरेल काय? असा प्रश्न विचारणे हे थोडे विचित्र दिसते खरे, परंतु त्याला आता उपाय नाही. कारण स्वतला विज्ञानवादी म्हणवून घेणाऱ्या या लोकांत वैज्ञानिक दृष्टिकोनाचाच मोठा अभाव आढळून येतो ही एक त्यांच्यातील गंमतीची विसंगती आहे.

## अंधश्रद्धेने जखडलेले अंधश्रद्धा निर्मूलनवादी !

या चळवळीतील लोक अंधश्रद्धा निर्मूलनाचा देखावा करीत असले, तरी स्वतःच ते एका भयंकर अंधश्रद्धेचे बळी झाले आहेत, ही वस्तुस्थिती आहे. त्यांची ही अंधश्रद्धा म्हणजे ज्ञात भौतविज्ञानाच्या सत्यापलीकडे जाणण्यासारखी कोणतीही सत्ये या विश्वात नाहीत, अशी त्यांनी स्वतःची करून घेतलेली समजूत होय. ही समजूत सपशेल खोटी असल्याचे परामानसशास्त्रज्ञांनी प्रत्यक्ष प्रयोगशाळेत अनेक प्रयोग करून वैज्ञानिक निकषांवर सिद्ध केलेले असतानाही हे लोक ते नाकारताना आढळून येतात. सामान्य लोकांची अंधश्रद्धा, त्यांच्यातील वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या अभावामुळे कदाचित क्षम्य मानता येईल. पण हे लोक विज्ञानवादाच्याच नावाखाली जाणूनबुजून एका भयानक अंधश्रद्धेचे पोषण करीत असल्याचे, स्वतःची आत्मवंचना व दुसऱ्यांची दिशाभूल करण्याचा पद्धतशीर प्रयत्न करीत असल्याचे आढळून येत असल्यामुळे त्यांच्या या कृतीचे कसलेही समर्थन करणे अशक्य आहे. हे विधान ज्यांना अतिरंजित वाटत असेल, त्यांनी [1]'**विज्ञान आणि बुद्धिवाद**' हा ग्रंथ वाचावा.

पण ज्या लोकांच्या अंधश्रद्धांचे निर्मूलन करायला हे लोक निघाले आहेत, ते लोक खरोखर अंधश्रद्ध आहेत, हे तरी या लोकांनी सिद्ध केले आहे काय, हा प्रश्न आहे. आणि याने स्पष्ट नकारार्थी उत्तर आहे. ही गोष्ट श्रद्धा व अंधश्रद्धा यात काय फरक आहे, हे स्पष्ट केले म्हणजे कळेल. (हा फरक हे लोक कधीच स्पष्ट करीत नाहीत, असे

---

१. '**विज्ञान आणि बुद्धिवाद**' या ग्रंथाचे 'बुद्धिप्रामाण्यवाद आणि परामानसशास्त्र' हे ३ रे प्रकरण पाहा.

आढळून येते. आणि याचे कारण हा फरक स्पष्ट केला, तर त्यांच्या चळवळीतील हवाच निघून जाते हे आहे !)

## श्रद्धा व अंधश्रद्धा यातील फरक

जेव्हा एखादी गोष्ट खरी आहे की खोटी, याविषयी कसलाच प्रत्यक्ष पुरावा नसतो, तरीही ती गोष्ट खरी मानण्यात येते, अशा वेळी ती गोष्ट श्रद्धाविषय ठरते. याच्या उलट एखादी गोष्ट खोटी असल्याबद्दल प्रत्यक्ष पुरावा आवळून येतो, तरीही ती खरी मानण्यात येते. अशा वेळी ती गोष्ट अंधश्रद्धेत मोडते. उदाहरणार्थ, ईश्वराचे अस्तित्व कुठल्याही पुराव्याच्या आधारे सिद्ध करता येत नाही. ईश्वर खोटा आहे अस्तित्वात नाही हेही कुठल्याही पुराव्यांनी सिद्ध करता येत नाही.[2] अशावेळी ईश्वर हा श्रद्धाविषय ठरतो. या उलट सशाला शिंगे आहेत, किंवा चंद्र खव्याचा बनला आहे असे कोणी मानू लागला, तर त्याचे हे मानणे अंधश्रद्धेत मोडते. कारण सशाला शिंगे आहेत, किंवा चंद्र खव्यांचा बनला आहे, ही समजूत खोटी असल्याचे प्रत्यक्ष पुराव्याच्या आधारे दाखवून देता येते. ईश्वराच्या बाबतीत असे दाखवून देता येत नाही. उलट ईश्वराचा अनुभव वैयक्तिकरीत्या येऊ शकतो. (भग भले कोणी त्या अनुभवाला श्रम म्हणो.) पण सशाच्या शिंगांचा वा चंद्रातील खव्याचा वैयक्तिक अनुभव येणे शक्य नाही. (आणि मला तो येतो असे कोणी म्हणू लागला, तर तो भ्रम असल्याचे प्रत्यक्ष पुराव्यांनी दाखवून देता येते.) श्रद्धा व अंधश्रद्धा यातील हा मुख्य फरक आहे. थोडक्यात, जी गोष्ट खोटी असल्याचे पुराव्यानिशी सिद्ध करता येत असतानाही ती खरी मानण्यात येते, ती अंधश्रद्धा व जी गोष्ट खरी की खोटी हे पुराव्यानिशी सिद्ध करता येत नाही, पण जिचा वैयक्तिक पातळीवर अनुभव अगर पडताळा येतो ही श्रद्धा होय.

---

*२. ईश्वर ज्या अर्थी डोळ्यांना दिसत नाहीत, त्या अर्थी तो खोटा आहे असे कोणी म्हणेल. पण डोळ्यांना न दिसणाऱ्या सर्वच गोष्टी खोट्या नसतात. उदा. मन, बुद्धी. भावना इत्यादी. तसेच भौतशास्त्रातील काही मूलभूत कणही डोळ्यांना दिसत नाहीत. म्हणजे त्यांचे फोटो काढण्यात येणाऱ्या क्लाऊड चेंबरमध्ये त्यांचे फोटो मिळत नाहीत.*

सशाला शिंगे आहेत, किंवा चंद्र खव्याचा बनला आहे. असे कोणी मानत नसले तरी अंधश्रद्धेचे स्वरूप स्पष्ट करण्यासाठी मुद्दाम ही उदाहरणे घेतली आहेत. तथापि, सामान्यपणे अंधश्रद्धा म्हणून समजल्या जाणाऱ्या गोष्टी वर स्पष्ट केलेल्या श्रद्धा व अंधश्रद्धा यातील फरकाच्या प्रकाशात तपासल्या, तर त्यांना अंधश्रद्धा म्हणावे काय, हा प्रश्न निर्माण होतो. उदा. नवसाला देव पावतो ही 'अंधश्रद्धा' घ्या, किंवा अंगात येण्याचा प्रकार घ्या. आता नवसाला देव पावतो या समजुतीविरुद्ध म्हणजे ही समजूत खोटी असल्याबद्दल काही प्रत्यक्ष पुरावा असेल, तर असे मानणे ही अंधश्रद्धा ठरेल. पण असा पुरावा कोणीही उपलब्ध करून दिलेला नाही. पण समजा, हे खरे आहे याबद्दलही प्रत्यक्ष पुरावा नाही. (असला तरी वादासाठी तो नाही, असे समजू.) अशा रीतीने ही गोष्ट खरी की खोटी याबद्दल पुरावा नसताना ती खरी मानली जात असेल, तर वरील श्रद्धा व अंधश्रद्धा यातील फरकाच्या स्पष्टीकरणाच्या प्रकाशात ती केवळ एक श्रद्धा ठरेल; अंधश्रद्धा ठरणार नाही. ती अंधश्रद्धा ठरण्यासाठी ही गोष्ट खोटी आहे, हे शास्त्रीय निकषावर (पुराव्यानिशी) सिद्ध करावे लागेल. पण असे कोणी सिद्ध केलेले नाही. असे सिद्ध करण्यासाठी कित्येक वर्षे व्यापक प्रमाणावर प्रयोग व निरीक्षणे करावी लागतील. (तो एक समाजमानसशास्त्रीय Psycho-social- प्रकल्प बनेल.) त्यासाठी संख्याशास्त्राची (Statistics) सुद्धा मदत घ्यावी लागेल. हे सिद्ध करणे कठीण किंवा अशक्य समजण्याचे कारण नाही. पण वादासाठी हे कठीण आहे असे समजले, तरी एखादी गोष्ट सिद्ध करणे कठीण आहे, म्हणून ती शास्त्रीय दृष्ट्या खोटी आहे, असे ठरत नाही.[3] नेमकी हीच चूक अंधश्रद्धा निर्मूलनवादी करतात. हीच गोष्ट अंगात येण्याविषयीच्या प्रकाराबद्दलही म्हणता येईल. किंबहुना भुते, भानामती, ज्योतिष्य, दैवी चमत्कार, शकुन इत्यादींबद्दलही म्हणता येईल. या सर्व गोष्टी शास्त्रीय दृष्ट्या खोटवा ठरण्यासाठी, म्हणजे त्या अंधश्रद्धा ठरण्यासाठी त्याविरुद्ध प्रत्यक्ष पुरावे शास्त्रीय संशोधनातून उपलब्ध करून द्यावे लागतील. तसे पुरावे उपलब्ध करून देऊन

३. उदा. निर्जीव पदार्थापासून जीव निर्माण होतो किंवा ही गोष्ट शास्त्रीय प्रयोगाने सिद्ध करणे कठीण असली तरी ही गोष्ट शास्त्रीय दृष्ट्या खोटी आहे, असे म्हणता येत नाही. तसे म्हटले तर उत्क्रांतिवादच खोटा ठरतो!

या अंधश्रद्धा असल्याचे कोणीही सिद्ध केलेले नाही. [4]आता या गोष्टीत बरीच बुवाबाजी चालते हे खरे आहे. पण याविषयी बुवाबाजी चालते, म्हणून या गोष्टी शास्त्रीय दृष्ट्या खोट्या ठरत नाहीत. कारण बुवाबाजी आणि शास्त्रीय सत्य या दोन अगदी भिन्न अशा गोष्टी आहेत. या दृष्टीने तथाकथित अंधश्रद्धा या शास्त्रीय दृष्ट्या अंधश्रद्धा आहेत, हे सिद्ध न करताच (किंवा तसे सिद्ध न होताच यांना अंध म्हणून झोडपत सुटणे, हे सवंग लोकप्रियता (आणि वृत्तपत्रीय प्रसिद्धी) मिळविण्याच्या दृष्टीने काहींना फायद्याचे वाटत असले, तरी हा मार्ग शास्त्रशुद्ध (आणि शास्त्रीय दृष्ट्या हितकारक) नाही. हे स्पष्ट आहे. आणि अशा प्रकारची लोकप्रियता मिळविण्याचा मोह किंवा लोकप्रिय विचारांचा, ते विचार केवळ लोकप्रिय आहेत म्हणून (खरे आहेत म्हणून नव्हे) पाठपुरावा करण्याचा मोह, बहुसंख्य लोकांना होत असल्याचे या विषयावरील लेखनबाजीवरून (आणि भाषणबाजीवरूनही) दिसून येते. याला साधुसंतांचाही अपवाद नाही.[5]

---

४. या अंधश्रद्धा असल्याचे 'सिद्ध' करण्यासाठी एक अजब पद्धत या अंधश्रद्धानिर्मूनवाद्यांनी हुडकून काढली आहे. ही पद्धत म्हणजे एक लाख रुपयांचे बक्षीस एखादी गोष्ट खरी असल्याचे सिद्ध करून ज्याअर्थी कोणी एक लाख रुपयांचे बक्षीस जिंकलेले नाही, त्याअर्थी ती गोष्ट खोटी खरेखोटे ठरविण्याची या लोकांची ही शास्त्रीय कसोटी एखाद्याचे भविष्य खोटे ठरले की ज्योतिष्यशास्व खोटे हो शास्त्रीय सत्य ठरविण्याची त्यांची दुसरी 'शास्त्रीय' कसोटी.

५. उदा. तुकारामांचे पुढील वचन पाहा : 'नवसे कन्या पुत्र होती तरी का करणे लागे पती' एखादे दांपत्य मुले होण्यासाठी देवाला नवस बोलताना स्वीपुरुष संबंध न होताच मुले व्हावीत, असा काही नवस बोलत नाही उलट अशा संबंधापासून मुले होत नाहीत, म्हणून ते दांपत्य तो नवस बोलते. म्हणजे अशा संबंधांपासूनच मुले व्हावीत, म्हणून ते तो बोलते. पण ही साधी गोष्ट लक्षात न घेता मसाला अंधश्रद्धा ठरविण्यासाठी तुकारामांनी नवस बोलणाऱ्यावर अवास्तव व सरळ खोटा आरोप केला आहे. संत झाले म्हणून त्यांचे सर्व म्हणणे बरोबर म्हणून स्वीकारणे, हे कदाचित सज्जनपणाचे लक्षण असेल पण ते शास्वीय वृत्तीशी विसंगत आहे. आणि म्हणून

अशा रीतीने आपणाला श्रद्धा आणि अंधश्रद्धा यातील फरक स्पष्टपणे कळला, तर आपणाला मान्य करावे लागेल, की अंधश्रद्धा निर्मूलन करणे म्हणजे प्रयोग व निरीक्षण या द्वारा समाजातील सर्व श्रद्धांची शास्त्रीय निकषावर तपासणी करून, ज्या श्रद्धांविरुद्ध प्रत्यक्ष पुरावे आढळतील त्या श्रद्धा खोट्या आहेत, म्हणजे त्या आंधळ्या आहेत, हे त्याबद्दलचे प्रत्यक्ष (विरुद्ध) पुरावे समाजापुढे सार्वजनिकरीत्या मांडून दाखवून देणे. म्हणजे मग लोक त्यांचा आपोआप त्याग करतील. (वास्तविक ज्या गोष्टींच्याविरुद्ध पुरावे आहेत, अशा गोष्टीवर कोणीच श्रद्धा ठेवीत नाही. एखाद्या बाबाच्या भविष्यकवनाचा अनुभव आला नाही, तर त्याच्या पाठीमागे कोणीच धावणार नाही.)

परंतु अंधश्रद्धा निर्मूलन चळवळीचे हे उद्दिष्ट आहे, असे दिसत नाही. कारण या चळवळीच्या लोकांनी असले कोणतेही कार्य हाती घेतल्याचा पुरावा नाही.

---

शास्त्रीय दृष्टी बाळगणाऱ्यांनी संतांची वचने कधीच उद्धृत करू नयेत. कारण शास्त्र हा संतांचा प्रांत नव्हे. आणि हे अनेक उदाहरणांनी दाखवून देता येते. उदा. तुकारामांचेच हे आणखी एक वचन पाहा: 'जळामाजी मासा । झोपे तो कैसा जावे त्याच्या वंशा तेव्हा कळे ॥' पण शास्त्रज्ञांना मासे पाण्यात कसे झोपतात हे निरीक्षण प्रयोगाने कळू शकते. त्यासाठी त्यांच्या वंशाला जाण्याची जरुरी नाही. (मासे पाळणाऱ्या सामान्य माणसांनाही हे माहीत आहे.) तेव्हा संतांच्या वचनांकडे अंधश्रद्धाविरोधी मताच्या पुष्ट्यर्ण बोट करून दाखवणे चुकीचे आहे, हे स्पष्ट होईल. (अंधश्रद्धा निरोधी चळवळीतील लोक असे करताना कधीकधी आढळतात.)वैज्ञानिक दृष्टी रुजण्यासाठी विज्ञानाचा प्रसार हाच एकमेव उपाय आहे. चमत्कार खोटे ठरविणे हा नव्हे. अंधश्रद्धेचा रोगच होऊ न देणे, हे केव्हाही श्रेयस्कर. झालेल्या रोगावर मलमपट्टी करणे केव्हाही गौण आणि व्यर्थच होय.

---

## 'जगात चमत्कार होत नाहीत !' इति अं. अ. नि. समिती !

मनुष्य अगतिकतेतून परावलंबी व श्रद्धाळू बनतो हे खरे आहे. त्याच्या या अगतिकतेचा आणि श्रद्धाळूपणाचा काही धूर्त लोक फायदा उपटतात हेही खरे आहे. [6]पण हे देव व धर्म वा क्षेत्रातच घडते असे नसून समाजाच्या सर्वच क्षेत्रात घडत असते. डॉक्टर, व्यापारी, राजकीय पुढारी हे सुद्धा माणसाच्या या अगतिकतेचा व श्रद्धाळूपणाचा फायदा उपटत असतात. हा एक सामाजिक रोग आहे व त्याच्यावर सामाजिक उपाय योजला पाहिजे. अशा सामाजिक बुवाबाजीविरुद्ध चळवळ उभी करणे, हे एक मोठे सामाजिक कार्य असून त्याला कोणाचाही विरोध असण्याचे. कारण नाही. म्हणून अंधश्रद्धा निर्मूलनाची ही चळवळ बुवाबाजीविरुद्ध असेल, तर बाद निर्माण होण्याचे कारण नाही. पण मुळात या चळवळीचा उद्देश देवदेवता व धर्म (व त्यांच्या नावाने होणारे चमत्कार) हे खोटे आहेत, हे सिद्ध करण्याचा आहे. पण काही लोक दैवी शक्तीच्या व धर्माच्या नावाखाली बुवाबाजी करतात म्हणून देवदेवता, धर्म, 'चमत्कार' हे सर्व थोतांड आहे, असे ठरत नाही.[7] असे समजणे म्हणजे समाजात काही भोंदू वैध असतात, म्हणून वैद्यकशास्त्रच एक थोतांड आहे, असे प्रतिपादण्यासारखे आहे. अंधश्रद्धा निर्मूलनवाद्यांनी दैवी चमत्काराविरुद्ध उभी केलेली चळवळ ही समाजात भोंदू वैद्य आहेत, म्हणून वैद्यकशास्त्राविरुद्ध एखाद्याने चळवळ उभी करावी, तशा प्रकारची आहे. वैद्यकशास्त्राच्या खरेपणाविषयीच्या खात्रीतून व अनुभवातून लोक डॉक्टर लोकांवर विश्वास ठेवतात. तसेच दैवी अनुभवातून लोक मांत्रिक व देवर्षी यांच्यावर विश्वास ठेवतात. त्यांना या क्षेत्रात अनुभव आला नसता, तर लोकांची या लोकांवर श्रद्धा बसली नसती. त्यांची ही श्रद्धा

---

६. पुराव्याशिवाय कोणतीही गोष्ट खरी मानू नये, अगर तिच्यावर श्रद्धा ठेवू नये, हा दृष्टिकोन लोकात बाणण्यासाठी विज्ञानवादाचा प्रसार होणे अगत्याचे आहे. लोकात
७. लोक ज्याला 'चमत्कार' समजतात, ते विज्ञानाच्या दृष्टीने चमत्कार नसतात, या विचारासाठी **'विज्ञान आणि बुद्धिवाद'** या ग्रंथाचे प्रकरण २ पाहा.

---

7

आंधळी आहे, हे सिद्ध करण्यासाठी हे मांत्रिक व देवर्षी बनवेगिरी करतात एवढेच सिद्ध करून भागणार नाही. तर त्यांना येणारे दैवी अनुभव हा प्रम आहे, (कारण देव-देवता खऱ्या आहेत असे मानणे, हाच एक प्रम आहे.) हे सिद्ध करावे लागेल. आणि हे पुराव्यानिशी सिद्ध करावे लागेल. हे कोणीही आजतागायत सिद्ध करू शकलेले नाही, कारण हे सिद्ध करणे अशक्य आहे. हे अशक्य आहे याचे कारण हे कसे सिद्ध करायचे हेच कोणाला माहीत नाही. पण खरे कारण वेगळे आहे. खरे कारण देव-देवता व दैवी अनुभव हे भ्रम नाहीत हे आहे ! (देवदेवतांची शास्त्रीय उपपत्ती देणारी चर्चा **'विज्ञान आणि चमत्कार'** या ग्रंथात केली आहे.)

आणि म्हणून जो भ्रम नाही, जे खरे आहे, ते खोटे आहे, तो भ्रम आहे, हे सिद्ध करण्याच्या प्रयत्नाला यश येईल, असे समजणारे (आणि त्यासाठी समिती स्थापणारे) हे अंधश्रद्धानिर्मूलनवादीच एका मोठ्या भ्रमात आहेत, असे म्हणणे योग्य ठरणार नाही काय? असे म्हणणे योग्य ठरते, ते हा भ्रम आहे हे या लोकांना सिद्ध करता येत नाही म्हणून नव्हे, तर हा भ्रम नाही, हे प्रत्यक्ष पुराव्यांनी सिद्ध करता येते म्हणून! आणि हा भ्रम नाही, हे सिद्ध करता येत असल्यामुळेच, हा (देव-देवता, चमत्कार, इ.) भ्रम आहे. या गृहीत कृत्यावर आधारलेल्या या अंधश्रद्धा निर्मूलन चळवळीचा संपूर्ण मोऱ्या वाजतो. पण हे सिद्ध करण्यापूर्वीच (अर्थात हे पुढे सिद्ध करता येईलच) या चळवळीचा तात्विक पातळीवरसुद्धा बोऱ्या वाजलेला आहे. कारण ही चळवळ मुळी अंधश्रद्धा निर्मूलनासाठी नाहीच ! ती आहे श्रद्धा निर्मूलनासाठी !

## श्रद्धा निर्मूलन समिती !

ही चळवळ श्रद्धा निर्मूलनासाठी आहे, ही गोष्ट लपविण्यासाठी श्रद्धा व अंधश्रद्धा यातील फरक स्पष्ट करण्याचे हे लोक नेहमी टाळतात. श्रद्धा निर्मूलन हा या चळवळीचा मूळ उद्देश लोकांना कळला तर कोणीही तिच्यात सामील होणार नाही, ही गोष्ट हे लोक चांगली ओळखून असल्यामुळे तिला त्यांनी 'अंधश्रद्धा निर्मूलन समिती' असे गोंडस नाव दिले आहे. म्हणूनच या चळवळीतील लोक देव-देवता व धर्म यावर सरळ हल्ला न करता देवी चमत्कार खोटे आहेत, हे सिद्ध करून देव-देवता व धर्म यांचे अप्रत्यक्षपणे उच्चाटन करण्याचे तंत्र अवलंबिले आहे. पण हे अशक्य आहे, हे त्यांच्या लक्षात येत नाही. कारण श्रद्धा हा केवळ धर्माचाच आधार नसून मानवी

जीवनाचाच तो आधार आहे. किंबहुना ज्या विज्ञानावर मानवी जीवन आधुनिक युगात आधारलेले आहे, त्या विज्ञानाचा सुद्धा बडा हा आधार आहे. उदा. ज्या कार्यकारण भावावर विज्ञान आधारलेले आहे. सो कार्यकारणभाव ही विज्ञानाची एक श्रद्धा असल्याचे वैज्ञानिकांनीच मान्य केले आहे. कट्टर बुद्धिप्रामाण्यवादी म्हणून प्रसिद्ध असलेल्या बट्रांड रसेलनेसुद्धा हे मान्य केले आहे.' [8]अशा रीतीने धर्मच नव्हे, तर विज्ञानसुद्धा श्रद्धेवर आधारलेले असताना म्हणजे श्रद्धेशिवाय विज्ञानाचेसुद्धा चालत नसताना श्रद्धेचे निर्मूलन करण्याचा या लोकांचा प्रयत्न कीलोत्पाटन करणाऱ्या माकडाच्या प्रयत्नाप्रमाणे अव्यापारेषु व्यापार ठरतो आणि म्हणून तथाकथित अंधश्रद्धा निर्मूलनाची ही चळवळ मुळात श्रद्धानिर्मूलन चळवळ असल्याने सैद्धांतिक दृष्ट्या भूर्खपणाची ठरते. ही चळवळ श्रद्धा निर्मूलनासाठीच आहे, ही गोष्ट या चळवळीचे अध्वर्यु श्रीलंकेचे अब्राहम कोवूर या भौतवादी व नास्तिक गृहस्थांनी लिहिलेल्या 'Begone Godmen' आणि 'Gods, Demons and Spirits' या दोन पुस्तकात प्रकट केलेल्या विचारावरून स्पष्ट होते.

## अब्राहम कोवूर आणि अंधश्रद्धानिर्मूलन

या दोन पुस्तकात चमत्कार अशक्य असल्याचे भूत, भानामती वगैरे खोटे असल्याचे, देव अस्तित्वात नसल्याने धर्म व धार्मिक विधी वगैरे सर्व थोतांड असल्याचे कोवूरनी प्रतिपादले आहे. हातातून विभूती काढण्यासारखे दैवी सामर्थ्याचे तथाकथित चमत्कार म्हणजे शुद्ध लबाडी किंवा हातचलाखी असून आपणसुद्धा ते करू शकतो, हे प्रात्यक्षिक करून दाखवत असल्याचे फोटो या पुस्तकात छापले आहेत. सुमारे तीस वर्षांपूर्वी त्यांनी महाराष्ट्र-कर्नाटकात दौरा काढून आपल्या या विचारांचा सभा, प्रात्यक्षिके, भाषणे या द्वारा प्रसार केला. परिणामी अनेक ठिकाणी त्यांच्या नॅशनलिस्ट असोसिएशनच्या शाखा काढण्यात आल्या व बऱ्याच जणांनी त्यांचे शिष्यत्वही पत्करले. या शिष्यांनी गुरूच्या पावलांवर पाऊले ठेवून चमत्कार

---

८. रसेलच्या Sceptical Essays' या ग्रंथातील 1s Science Superstitious हॉ निबंध पाहा.

करून दाखवणाऱ्यास एक लाख रुपयांचे बक्षीसही जाहीर केले. स्वतःकोवूरांच्या हयातीत त्यांचे आव्हान स्वीकारून काहीजण अपयशी ठरल्यामुळे या लोकांच्या विचारांचा प्रभाव बऱ्याच जणांवर विशेषतःया विषयाचा अभ्यास नसलेल्यावर - पडला. भरीस भर म्हणून हातातून विभूती काढण्याच्या चमत्काराबद्दल जगप्रसिद्ध झालेल्या पुट्टपतींच्या सत्यसाईबाबांनी या कोवूरांना आपल्या दरवाजाच्या आत येऊ न दिल्यामुळे हे चमत्कार खोटे आहेत, असे म्हणायला हे लोक अनायासेच मोकळे झाले. दुर्दैवाने साईबाबांच्या भक्तांनी अतिउत्साहाच्या भरात थोडे अवास्तव लेखन करून या समजुतीला बळकटी आणण्यास अप्रत्यक्षपणे हातभारच लावला. याच काळात कर्नाटकातील म्हैसूरजवळील पांडवपूर नावाच्या गावात भोंदूगिरी करणारे एक कुटुंब उपटले व त्यांचे बिंग या लोकांनी बाहेर पाडले. विभूती काढण्याचा चमत्कार करणाऱ्या या कुटुंबातील मुलाला त्याच्या आईबापांनी कृष्णसाई हे नाव देऊन त्यांनी सत्यसाईबाबांच्या बदनामीस हातभार लावला. आजतागायत या लोकांचे आव्हान कोणीच स्वीकारले नसल्यामुळे (मग त्याची कारणे कोणतीही असोत ) चमत्कार हे थोतांड आहे व पर्यायाने धर्म व देवांच्या नावावर चाललेल्या सर्व गोष्टी अंधश्रद्धेत मोडतात, या त्यांच्या म्हणण्याला वरवर बळकटी मिळाल्याचे काही अर्धशिक्षित लोकांना पटू लागले. वृत्तपत्रांचा अंधश्रद्धा निर्मूलनाला नेहमीच पाठिंबा असल्याने (कारण आपण अंधश्रद्धेला उत्तेजन देतो, असा लोकांचा समज होऊ देणे त्यांना परवडणारे नाही) या लोकांना अनायासेच भरपूर प्रसिद्धी मिल लागली.

अशा परिस्थितीत अंधश्रद्धेविरुद्धच्या चळवळीचे वारू चौफेर उधळू लागले नाही तरच नवल. हे वारू म्हणजे एक कागदी घोडा आहे, हे मात्र काही लोकांनी मनोमन ओळखले होते. पण ते काहीच करू शकत नव्हते. कारण एक तर अंधश्रद्धेविरुद्धच्या वातावरणामुळे त्यांच्या विचारांना वृत्तपत्रात प्रसिद्धी मिळत नव्हती व दुसरे, आपले म्हणणे सिद्ध करण्यासारखा सज्जड पुरावा त्यांना सहजासहजी उपलब्ध होत नव्हता. आणि उपलब्ध झाला तरी चारचौघात जाहीरपणे प्रयोगाने तो दाखवून देता येत नव्हता. (दाखवता आला तरी तो कोण मानणार होते? हे पुढे स्पष्ट होईलच !) या लोकांना सत्यसाईबाबांनी आपला प्रयोग नियंत्रित परिस्थितीत करून दाखवून या

लोकांना त्यांची योग्य जागा दाखवून देऊ नये, याची खंत वाटत होती.[९] पण सत्यसाईबाबा हे आध्यात्मिक वृत्तीचे असल्याने त्यांना चमत्कारांचे महत्त्व वाटत नव्हते. (मग हे चमत्कार का करून दाखवत होते, हा प्रश्नच आहे.) आणि हीच गोष्ट या लोकांच्या पथ्यावर पडली होती. पण सुदैवाने या लोकांना त्यांची योग्य जागा दाखवून देणारी एक व्यक्ती महाराष्ट्रातच त्यांना भेटली आहे, आणि त्यामुळे अंधश्रद्धा निर्मूलनाच्या चळवळीचा घोडा कागदी आहे हे तर सिद्ध झालेच आहे, पण निर्मूलनवादच आता मोडीत निघाला आहे. याविषयीचा घटनाक्रम साद्यंत सादर करणे, हाच या लेखाचा हेतू आहे.

## अनुराधाबाईंचा चंदूर गावातील चमत्कार



माऊलीच्या शिवअवतीर्ण अवस्थेत रिक्त हातात विभुती प्रसाद निर्माण होत असताना

सोलापूर जिल्ह्यातील मोहोळ तालुक्यात मसलेचीधरी नावाचे एक लहान खेडे आहे. या खेड्यातील एका पडदानशीन मराठा कुटुंबातील अनुराधा नावाच्या स्त्रीच्या अंगात सोमनाथ या देवाचा त्याच्यावरील लहानपणापासूनच्या भक्ती-उपासनेमुळे, संचार होत असल्याची व या संचार अवस्थेत तिच्या रिक्त हातातून विभूती, गुलाल, रुद्राक्ष, बेल इ. वस्तू निघत असल्याची घटना सुमारे पाच वर्षांपासून घडत असल्याचे सांगण्यात येते. (हा लेख १९८८ साली लिहिला आहे.)

---

९. सत्यसाईबाबांची परीक्षा नियंत्रित परिस्थितीत घेण्याची वास्तविक आवश्यकता भासू नये इतके सार्वजनिकरीत्या त्यांनी प्रयोग केले आहेत. तथापि कालिंस ऑसिस आणि हरॉल्डसन या पाश्चात्य शास्त्रज्ञांनी त्यांची तपासणी केली आहे, याकडे कोणी लक्ष देत नाही, किंवा मुद्दाम त्याकडे दुर्लक्ष करण्यात येते. (पाहा **विज्ञान व चमत्कार** शेवटचे प्रकरण)

याविषयीचे सविस्तर वृत्त 'श्री' साप्ताहिकाने आपल्या २८ फेब्रु. ते ६ मार्च ८७ च्या अंगात प्रथम प्रसिद्ध केले. पण 'श्री' नेहमी खोट्या बातम्या देते, अशी स्वतःची सोईस्कर समजूत करून घेतलेल्या अंधश्रद्धा निर्मूलनवाद्यांनी तिच्याकडे दुर्लक्ष केले.

वस्तुतःजेथे जेथे चमत्कार पडतात, अशी बातमी येते, तेथे तेथे साबडतोब धावून जाऊन त्याची तपासणी करणे व ते थोतांड असल्याचे सिद्ध करून जनतेची फसवणूक थांबविणे हे **चमत्कार अशक्य म्हणणाऱ्या** व अंधश्रद्धा निर्मूलनाची चळवळ करणाऱ्या लोकांचे प्राथमिक कर्तव्य आहे. बातमी खरी की खोटी याची शहानिशा करणे हासुद्धा त्यांच्या कर्तव्याचाच एक भाग आहे. असे असूनही या लोकांनी कसलीच हालचाल केली नाही. पण एक दिवस असा उजाडला की, त्यांना या चमत्काराच्या घटनेची दखल घ्यावीच लागली. हा दिवस होता २५ मार्च १९८८ आणि ठिकाण होते इचलकरंजीहून ३-४ किलोमीटर अंतरावरील चंदूर हे खेडे.

चंदूर गावचे प्रमुख पुढारी हे सोमनाथ भक्त असून त्यांनी २५ मार्च रोजी अनुराधाबाईंच्या हस्ते पूजेचा कार्यक्रम आपल्या गावी आयोजित केला होता. या कार्यक्रमाची बातमी इचलकरंजीत पसरल्यामुळे तेथील अंधश्रद्धा निर्मूलनवादी लोक वृत्तपत्रांच्या वार्ताहरांना आपल्याबरोबर घेऊन चंदूरला आले होते. तेथे काय घडले याविषयीची बातमी महाराष्ट्रातील अनेक वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाली आहे. पुण्याच्या दै. तरुण भारतने 'अंधश्रद्धा निर्मूलन समितीच्या कार्यकर्त्यांची अशी ही फजिती' या मथळ्याखाली १ एप्रिलच्या (कोल्हापूर) अंकात ही बातमी दिली असून त्या बातमीतील महत्त्वाचा भाग खाली देत आहे.

*"गेल्या पाच सहा वर्षांपासून 'अनुराधाबाई' अशा पद्धतीने (रिक्त हातातून) विभूती आणि शिवलिंग काढून देतात. सुरुवातीला त्या काही काळ जप करतात, आणि नंतर एकाएकी त्यांच्या अंगात संचार होतो. त्या काळात त्या लोकांनी विचारलेल्या अनेक प्रश्नांची उत्तरे देतात, हा सर्व प्रकार येथील काही पत्रकारांनी सुद्धा पाहिला आहे."*

*"अनुराधाबाईची गाडी अंधश्रद्धा निर्मूलन समितीच्या कार्यकत्यांनी रस्त्यातच अडवली, आणि त्यांना विविध प्रश्न विचारले. सर्व प्रश्नांना त्यांनी शांतपणे उत्तरे दिली.*

*आम्हाला येथेच वाटेतच चमत्कार करून दाखवा, असा आग्रह त्यांनी धरला. तेव्हा अनुराधाबाईनी आपले दोन्ही हात उंचावून मोकळे असल्याचे सर्वांना सांगितले आणि नंतर त्यांनी विभूती आणि शिवलिंग काढून दाखवले. विशेष म्हणजे समितीच्या कार्यकत्यांच्या हातातच शिवलिंग व विभूती पडली. आम्हाला तुमचे ढोंग आहे हे आता सिद्ध करता आलेले नाही, पण अशा चमत्कारावर आमचा विश्वास नाही, असे हे अंधश्रद्धा निर्मूलन समितीवाले म्हणू लागले. तेव्हा उपस्थित लोकांनी त्यांची हुर्योबाजी " करून त्यांना पिटाळून लावले.'*

काही वृत्तपत्रांत समितीच्या कार्यकत्यांना धक्काबुक्की, मारहाण, त्यांच्या गाड्यांवर दगडफेक इ. केल्याचे प्रसिद्ध झाल्याचे सांगण्यात येते. चंदूर गावच्या लोकांना भेटून प्रस्तुत लेखकाने यासंबंधी विचारले असता समितीच्या लोकांनी बाईंना असभ्य प्रश्न विचारल्याने लोक चिडल्याचे व त्यांची हुर्यो केल्याचे त्यांनी कबूल केले. पण मारहाण, धक्काबुक्की केल्याचे एकानेही सांगितले नाही.

## आव्हाने प्रतिआव्हाने

यानंतर १२ एप्रिलच्या पुण्याच्या 'तरुण भारत' मध्ये अं. प्र. नि. स. चे कार्याध्यक्ष या नात्याने डॉ. नरेंद्र दाभोळकर यांनी "**अनुराधा देखमुखांनी आव्हान स्वीकारावे**" या मथळ्याखाली एक पत्र प्रसिद्ध करून रिक्त हातातून अंगारा व शिवलिंग काढून दाखवावे व एक लाख रुपयांचे बक्षीस मिळवावे, असे आव्हान दिले. हे शक्य न झाल्यास वा त्यांनी माघार घेतल्यास त्या फसवणूक करतात, असे समजून पोलिस कारवाई करण्याचा विचार करावा लागेल, असेही त्यांनी त्यात म्हटले आहे.

याला उत्तर म्हणून अनुराधाबाईच्या वतीने सात भक्तांनी (या सर्व प्रतिष्ठित व्यक्ती आहेत) अं. श्र. नि. स. चे आव्हान स्वीकारल्याचे पत्रक वृत्तपत्रांना प्रसिद्धीस दिले. ते निरनिराळ्या मथळ्याखाली अनेक वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाले असून त्यामध्ये 'एक लाख रुपये आमच्या दृष्टीने महत्त्वाचे नसून आपण १५ मे रोजी (अमावास्येच्या दिवशी) मसलेचौधरी येथे सकाळी ७ वाजता यावे व चमत्काराची खात्री करून घ्यावी' असे 'आवाहन' केले आहे. मात्र पूजेचे पावित्र्य राखावे, विरोधकाच्या

भावनेने येऊ नये, मांसाशन, स्त्रीविटाळ इत्यादी टाळावे. व्हिडिओ, क्लोजसर्किट टी. व्ही. आणण्यास हरकत नाही, इत्यादी गोष्टींचाही त्यात उल्लेख केला आहे.

यानंतर २२ एप्रिल रोजी श्री. दिनकरराव शिंदे, राणंद, ता. माण, जि. सातारा यांनी अनुराधाबाईच्यावतीने "**श्री दाभोळकरांना अनुराधाबाईचे आमंत्रण"** या मथळ्याचे पत्र व्यक्तिशःदाभोळकरांच्या घरी जाऊन त्यांना दिले. यावेळी दाभोळकरांनी आपण बाईची नखशिखांत अंतर्बाह्य तपासणी करू असे उद्गार काढल्याने शिंदे यांना आपल्या श्रद्धा व्यक्तीबद्दलचे हे अनादराचे उद्गार ऐकून वाईट वाटले व थोडा संतापही आला. पण जास्त काही न बोलता त्यांनी त्या पत्राची पोच मागितली. पण दाभोळकरांनी पोच देण्याचे नाकारले. म्हणून परत २५ एप्रिल रोजी रजि. पोस्टाने त्यांना शिंदे यांनी आमंत्रण-पत्र पाठवले. त्याची पोच २८ एप्रिलला मिळाली. या पत्रात आपल्या सर्व अटीखाली तपासणी आपण करू शकता असे कळविले होते. त्यासाठी १५ मे रोजी मसलेचौधरीला सकाळी ७ वाजता यावे, असे आवाहन त्यात केले होते.

श्री. शिंदे जणू आपल्याला भेटलेच नाहीत, अनुराधाबाईंचे आमंत्रणही आपणाला मिळालेले नाही, अशा थाटात लगेच दाभोळकरांनी २५ एप्रिल रोजी एक पत्रक प्रसिद्ध करून पुन्हा आव्हान दिले. हे आव्हान **'दै. तरुण भारत'**च्या २ मेच्या अंकात प्रसिद्ध झाले असून त्यात 'अंगावरील वस्त्रे, पूजासाहित्य इ. समितीतर्फे दिले जाईल व अनुराधाबाईच्या मांसाहार न करणे इ. सर्व अटी पाळल्या जातील, पण पुणे, सातारा, कोल्हापूर यापैकी कोणत्याही शहरात ही चाचणी घेतली जाईल,' असे म्हटले आहे. याला उत्तर म्हणून पुन्हा सोमनाथ दरबारात येण्याचे आवाहन श्री. शिंदे यांनी साताराच्या 'ग्रामोद्धार' मध्ये १० मे रोजी केले. परत १३ मेच्या सातारा येथील 'ऐक्य' मध्ये समितीचे 'सौ. देशमुखना आव्हान' या आशयाची बातमी प्रसिद्ध झाली.

याच सुमारास प्रस्तुत लेखकाने 'अंधश्रद्धा निर्मूलन समितीची माघार' या मथळ्याखाली **'पुढारी', 'केसरी', व 'तरुण भारत'** या वृत्तपत्रामध्ये एक पत्र प्रसिद्धीस दिले. हे पत्र लिहिताना इचलकरंजीहून आलेल्या समितीच्या कार्यकर्त्यांनी चंदूरच्या लोकांसमक्ष 'आम्ही या चमत्काराची तपासणी कोठेही जाऊन करण्यास तयार आहोत' असे जे विधान केले होते, ते मनात प्रामुख्याने होते. या पत्रात

मसलेचौधरीला जाण्याऐवजी कोल्हापूर, सातारा येथे हा चमत्कार तपासून पाहण्याचा हट्ट धरल्याबद्दल समितीला दोष दिला होता. तसेच विज्ञानवादी वैज्ञानिक सत्य शोधण्यासाठी कोठेही कसे जातात हे सांगितले होते. स्वतः कोवूर हे (या लोकांचे गुरू) सत्यसाईबाबांचा हाच चमत्कार पाहण्यासाठी पुट्टपर्थीला धावून गेल्याचीही आठवण त्यांना करून दिली होती.

## समितीने शेवटी आव्हान स्वीकारले नाही

दरम्यान १५ मे ( अमावस्या) रोजी ठरल्याप्रमाणे प्रस्तुत लेखकाने मसलेचौधरीला जाऊन तेथे अनुराधाबाईचा विभूतीचा चमत्कार प्रत्यक्ष पाहिला. या कार्यक्रमाला अं. नि. स. चे दाभोळकर येतील म्हणून त्यांची सकाळी १० वाजेपर्यंत वाट पाहिली. १०-१५ ला श्री. शिंदे आले व अं. श्र. नि. स. चे कोणीही येणार नाही, असे त्यांनी सांगितल्यावरून पूजाविधी सुरू झाला. यावेळी प्रस्तुत लेखकाने कॅमेऱ्याने विभूतीच्या चमत्काराची दृश्ये टिपली. प्रथम अनुराधाबाईंच्या रिक्त हातातून गुलाल पडण्यास सुरुवात झाली. दोन-तीन मिनिटे हा गुलाल पडत होता. नंतर लगेच त्याच हातातून शुत्र विभूती पडण्यास सुरुवात झाली. नंतर रुद्राक्षही पडले. याविषयीचे बातमीपत्रक लेखकाने **'पुढारी', 'केसरी' व 'तरुण भारत** ला प्रसिद्धीस दिले. ते फक्त 'तरुण भारत' ने प्रसिद्ध केले. हे बातमीपत्र २३ मेच्या अंकात प्रसिद्ध झाले असून ते जसेच्या तसे खाली देत आहे.

## *अंधश्रद्धा निर्मूलन आव्हान स्वीकारले नाही.*

*कोल्हापूर दि. २२ प्रतिनिधी) हातातून विभूती काढून दाखवण्याचा चमत्कार करणाऱ्या अनुराधाबाई देशमुख यांनी दिलेल्या आव्हानास अंधश्रद्धा निर्मूलन समितीचे अध्यक्ष डॉ. दाभोळकर यांनी प्रतिसाद दिला नाही. १५ मे रोजी मोहोळ तालुक्यातील मसलेचौधरी या गावी येऊन अनुराधा देशमुख यांचे चमत्कार हे एक थोतांड आहे, असे सिद्ध करून दाखवावे, असे आव्हान डॉ. दाभोळकर यांना देण्यात आले होते, अशी माहिती मसलेचौधरी येथे निरीक्षणासाठी गेलेले प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांनी येथे एका प्रसिद्धीपत्रकात दिली आहे.*

मसलेचौधरी या गावातील महादेवाच्या मंदिरात हा चमत्कार तपासून पाहण्याचा कार्यक्रम होता. १५ मे रोजी सकाळी ७ वाजता कार्यक्रमाची सर्व सिद्धता करण्यात आलो. पण ज्यांच्यासाठी हा कार्यक्रम आयोजित केला होता, ते डॉ. दाभोळकर आलेच नाहीत. ते येतील म्हणून बरीच वाट पाहिली.

यावेळी मोहोळ तालुक्यातील पोलिस उपनिरीक्षक आपल्या सहकाऱ्यांसमवेत आले होते.

डॉ. दाभोळकर यांना माझ्या हातून घडणाऱ्या चमत्काराची तपासणी करण्याचे मी आमंत्रण दिले होते. पण त्यांनी माझ्या आमंत्रणाचा स्वीकार केला नाही. मी चमत्काराच्या नावाखाली जनतेची फसवणूक करते, असा आरोप डॉ. दाभोळकर यांना आता करता येणार नाही. असे खुद्द अनुराधा देशमुख यांनी एका प्रसिद्धी पत्रकात म्हटले आहे.



श्री सत्यसाई प्रतिष्ठीत शिवालय, चाकूर
येथे माऊलींच्या पुजेतून भक्तश्रेष्ठ श्री उत्तमराव जाधव
यांना स्पटिक स्वरूपात भक्तीमाला प्रदान

*(ता. क. या फोटोत अनुराधा देशमुख स्फटिक माला चाकूरच्या उत्तमराव जाधवांना आपल्या बंद मुठीतून देताना दिसतात. तिथले प्रत्यक्ष दर्शक ते घडत असताना काही इंचावरून हातात घेत असताना इथे दिसत आहे. - फोटो शशिकांत ओक यांनी सादर केला आहे. ) १७ सप्टेंबर २०२३ .*

यानंतर दाभोळकरांनी (बहुधा याला उत्तर म्हणून) **चमत्काराबाबतची सत्यस्थिती**' या मथळ्याखाली **पुढारी**मध्ये एक पत्र ११ जून रोजी प्रसिद्ध केले. त्यामध्ये त्यांनी म्हटले आहे की, "अंधश्रद्धा निर्मूलन समितीने सौ. अनुराधा देशमुख यांना संचार अवस्थेत हातातून विभूती व शिवलिंग काढतात हा त्यांचा चमत्कार सिद्ध करण्याचे आव्हान दिले आहे. मी ते स्वीकारले असा दावा त्या करत असून तो पूर्णपणे दिशाभूल करणारा आहे. त्यांनी सही करावयाचे आव्हान मसुदा पत्र त्यांना रजिस्टर पोच पावतीने मिळाले असून आजतागायत त्यांनी ते सही करून परत पाठविले नाही. हा मसुदा असा " असे म्हणून पुढे उभयपक्षी पाळावयाच्या अटी वगैरे दिल्या आहेत. याला उत्तर म्हणून प्रस्तुत लेखकाने १६ जूनच्या 'पुढारी' मध्ये पुढील पत्र प्रसिद्ध केले.

## चमत्कारासंबंधी प्रश्न

'चमत्काराबाबतची सत्यस्थिती जनतेला कळण्यासाठी श्री. दाभोळकरांनी पुढील प्रश्नांची उत्तरे देणे आवश्यक आहे.

१. सौ. देशमुखांचे आव्हान आपण स्वीकारलेले नाही, असे दाभोळकरांचे म्हणणे आहे. त्यांनी ते का स्वीकारलेले नाही? त्यांनी स्वीकारले नाही म्हणून देशमुखांचे काम बिघडणार आहे ? अगर नुकसान होणार आहे ?

२. दाभोळकरांनी देशमुखांना सहीसाठी पाठविलेल्या 'आव्हान मसुदा पत्रा'वर त्यांनी आजतागायत सही करून ते पत्र परत पाठविलेले नसेल तर ते गप्प का बसले आहेत? कायदेशीर इलाज करण्यास ते का प्रवृत्त होत नाहीत?

३. अंधश्रद्धा निर्मूलन हे एक सामाजिक कार्य असताना ते करण्यासाठी 'आव्हान प्रक्रिये' चा किंवा 'आव्हान मसुदा पत्रा'चा घोळ ते का घालत आहेत?

४. पांडवपुरच्या कृष्णसाईच्या हातातून विभूती काढण्याचा चमत्कार बेंगळूरच्या एच्. नरसिंहय्या यांनी प्रत्यक्ष पांडवपुरला जाऊन तपासणी करून खोटा असल्याचे सिद्ध केले होते. तसे मसलेचौधरीला जाऊन सौ. देशमुखांचा हा चमत्कारही खोटा असल्याचे सिद्ध करण्याचा प्रयत्न दाभोळकर का करत नाहीत?

५. दाभोळकरांच्या आव्हान प्रक्रियेच्या तपशिलात एक लाख रुपयांच्या बक्षीसाचा उल्लेख का नाही? स्वतःवर कसलीही अट लादून न घेणाऱ्या दाभोळकरांना सौ. अनुराधा देशमुखांवर स्वतच्या अटी लादून त्या पाळण्यास सांगण्याचा काय अधिकार आहे?

वरील प्रश्नांची उत्तरे दाभोळकरांनी प्रामाणिकपणे द्यावीत. अन्यथा सूज्ञ लोक काय निष्कर्ष काढायचा तो काढतील.

-प्राचार्य अद्वयानंद गळतगे.

या पत्राला दाभोळकरांनी आजतागायत उत्तर दिलेले नसल्यामुळे या प्रकरणात लक्ष घातलेल्या सूज्ञ वाचकांनी योग्य तो निष्कर्ष काढलाच असेल. माझे पत्र दखल घेण्याच्या लायकीचे नाही, असा निष्कर्षही काहींनी काढला असणे शक्य आहे. आणि बहुधा तोच निष्कर्ष बरोबर असण्याचा संभव जास्त आहे. कारण समितीच्या लोकांनी दखल न घेण्याच्या लायकीची पत्रे व घटना हीच जास्त असण्याचा संभव आहे !

---

## रिक्त हातातून विभूती काढण्याचा नियंत्रित प्रयोग

२५ जून रोजी पिंपरी (पुणे) येथे अनुराधाबाईंचा एका भक्ताच्या घरी पूजा कार्यक्रम झाला. त्या कार्यक्रमातील विभूतीच्या चमत्काराचे व्हिडिओ चित्रीकरण करणे व नियंत्रित परिस्थितीत त्याची तपासणी व निरीक्षण करणे हे उद्दिष्ट समोर ठेवून प्रस्तुत लेखकाने संबंधित भक्ताला सहकार्याची विनंती केली. त्याप्रमाणे त्यांनी ती मान्य केली व सर्व सहकार्य केले. पुण्याचे प्रसिद्ध परामानसशास्त्रज्ञ प्रा. व. वि. अकोलकर यांना प्रस्तुत लेखकाने या बाबतीत मार्गदर्शन करण्याची विनंती केली. पण ते प्रकृती अस्वास्थ्यामुळे कार्यक्रमास हजर राहू शकले नाहीत. तथापि, त्यांनी

आपल्या दोन प्राध्यापक सहाय्यकांना सोबत पाठवून दिले. कोल्हापूर येथील 'पश्यंती विद्या वलय' या संस्थेचे संचालक व संपादक प्रा. कृष्णा गुरव आणि या संस्थेच्या संस्थापिका व प्रकाशिका सौ. कमल लडकत हे दोघेही मदतीला सोबत होते.

सौ. अनुराधाबाईना नियंत्रित परिस्थितीत प्रयोग करून दाखवण्याची पूजेच्या अगोदर केवळ याच मिनिटांत विनंती करण्यात आल्याने त्या थोडा आश्चर्यचकित झाल्या. पण त्यांनी विनंतीला आनंदाने मान्यता दिली. तदनुसार सौ. कमल लडकत व त्यांची मुलगी यांच्या समक्ष भक्ताने दिलेले पातळ अनुराधाबाईंनी नेसले. भक्तांनी दिलेले पूजेचे साहित्य वापरले. पूजेला बसल्यानंतर बाईंच्या मांड्यांवरून शुभ वस्त्र (भक्ताच्या घरचे) घालण्यात आले. व्हिडिओने चित्रीकरण करणारा कॅमेरामन स्वतः हातातून भस्म काढण्याची जादू करणारा पूर्वाश्रमीचा जादूगार असल्याने त्याला फारशा सूचना देण्याची आवश्यकता भासली नाही. तथापि, दोन्ही हातावरचा कॅमेरा किंचितही कळू न देण्याची प्रमुख सूचना त्याला कटाक्षाने पाळण्याची ताकीद देण्यात आली. आणि अशा परिस्थितीत हा कार्यक्रम यशस्वीरित्या पार पडला.

अनुराधाबाईंनी यावेळी सुगंधी भस्म व रुद्राक्ष रिक्त हातातून काढून दाखविले. (या भस्माचा सुगंध एक महिनाभर टिकून होता. प्रस्तुत लेखकाला रुद्राक्ष मिळाले.)

दुसरे दिवशी म्हणजे २६ जून रोजी सौ. अनुराधाबाईची प्रा. अकोलकरांच्या घरी सविस्तर मुलाखत घेण्यात आली व बाईंनी काही प्रश्नांची लेखी उत्तरेही दिली. त्यामध्ये वृद्ध स्त्रीने दिलेली साडी तिच्यासमोर नेसण्यास मी तयार आहे, पांढरे वस्त्र मांडीवर टाकण्यास किंवा बांधण्यास काहीच हरकत नाही इ. अटी स्वाक्षरीने प्रा. अकोलकरांनी बाईंच्याकडून लिहून घेतल्या. **(ज्या अटी अनुराधाबाईनी पिंपरीतील आदल्या दिवशीच्या कार्यक्रमात प्रत्यक्ष पाळल्या होत्या,** त्या अटी लेखी मान्य करण्यात त्यांना अडचण वाटण्याचे काहीच कारण नव्हते.)

यानंतर प्रस्तुत लेखक, प्रा. कृष्णा गुरव, सौ. कमल लडकत व डॉ. सी. बी. देसाई यांनी १३ जुलै रोजी (अमावास्येच्या दिवशी) मसलेचौधरी येथे जाऊन पुन्हा रिक्त हातातून विभूती काढण्याचा प्रयोग पाहिला. यावेळी संचार अवस्थेत कोल्हापुरास 'पश्यंती' मध्ये पूजा घेण्याची अनुमती विचारली असता ती मिळाली व ४ ऑगस्टची तारीख देण्यात आली. ४ ऑगस्ट या नियोजित दिवशी हा पूजाविधी

कोल्हापूरच्या 'पश्यंती' मध्ये ठरल्याप्रमाणे संपन्न झाला. यावेळीही व्हिडिओने चित्रीकरण करण्यात आले. शिवाय प्रत्येक कृतीचे अनुक्रमाने कॅमेऱ्याने फोटोही घेण्यात आले. या कार्यक्रमात करवीर पीठाचे जगदगुरु शंकराचार्य विद्याशंकर भारती प्रा. पां. ना. कुलकर्णी, कलामहर्षी गणपतराव वडणगेकर, डॉ. सी. बी. देसाई, इ. मान्यवर मंडळी उपस्थित होती.

प्रस्तुत लेखकाने एकंदरीत चार वेळा अनुराधाबाई देशमुखांच्या रिक्त हातातून विभूती, रुद्राक्ष इ. वस्तू काढण्याचा प्रयोग अत्यंत काळजीपूर्वक व हातावरील नजर किंचितही ढळू न देता पाहिला आहे. (दोन वेळा आम्ही घातलेल्या अटीखाली पाहिला.) आणि यापैकी दोन प्रयोगांचे व्हिडिओने चित्रीकरण केले व तीन प्रयोगांचे स्थिर कॅमेऱ्याने शंभरभर फोटो घेतले. या निरीक्षणानंतर प्रस्तुत लेखकाची शंभर टक्के खात्री झाली आहे की, या प्रयोगात किंचितही लबाडी नाही. हे रिक्त हातातून विभूती, रुद्राक्ष व शिवलिंग इ. वस्तू काढण्याचे प्रयोग खरे असून याला दैवी चमत्कार म्हणावयाचे असेल, तर हे प्रयोग या नामाभिधानाला सर्वथैव पात्र आहेत. या प्रयोगांची वैज्ञानिक कारणमीमांसा काहीही असली, (हा परामानसशास्त्राचा व स्वतंत्र लेखाचा विषय आहे.[10]) तरी हे प्रयोग निस्संशय खरे असल्याने जगात चमत्कार असू शकत नाहीत, असे म्हणणाऱ्या लोकांना ते आव्हान आहेत. " [11]सत्यसाईबाबा सुद्धा अशाच प्रकारे रिक्त हातातून विधूती, रुद्राक्ष इ. वस्तू काढत असतात व त्यांचे कार्लिस ऑसिससारख्या पाश्चात्य शास्त्रज्ञाने अगदी जवळून निरीक्षण व व्हिडिओने

---

१०. या चमत्काराच्या वैज्ञानिक चिकित्सेविषयीची माहिती विज्ञान व चमत्कार या ग्रंथाच्या शेवटच्या प्रकरणात केली आहे.

" ११. हे धर्माचे विज्ञानाला आव्हान नसून विज्ञानाचे (चमत्कार अशक्य म्हणणाऱ्या) नव्या अंधश्रद्धेला आव्हान आहे. हमखास व पुनःपुन्हा एखादा प्रयोग करून एखादी गोष्ट सिद्ध करणे, हे प्रायोगिक विज्ञानाचे लक्षण असल्याने व अशाच पद्धतीने विभूतीचा प्रयोग (चमत्कार) करून दाखवला जात असल्याने हा प्रयोग वैज्ञानिक या संज्ञेला पूर्ण पात्र ठरतो. पुनरावर्तित्व (repeatability) हे विज्ञानाचे लक्षण मानले गेले असल्याने या वैज्ञानिक कसोटीला हे प्रयोग शंभर टक्के उतरतात.

चित्रीकरण करून ते प्रयोग खरे असल्याची खात्री करून घेतली आहे. तथापि, त्यांच्या व अनुराधाबाईंच्या पद्धतीमध्ये फार फरक आहे. सत्यसाईबाबा पूर्वसूचना न देता एकदम वस्तू काढतात आणि आपल्या अंगावरील कपडे तपासणे, दिलेले कपडे घालणे इ. गोष्टीस त्यांनी कधीच मान्यता दिलेली नाही. याउलट अनुराधाबाई आम्ही चालू त्या अटी पाळतात. या अटी त्या पाळण्यास तयार होतात. ही वस्तुस्थिती यात लबाडी नसल्याची प्रयोगकर्त्यांची खात्री पन्नास टक्के करून देते व उर्वरित पन्नास टक्के खात्री प्रत्यक्ष प्रयोग पाहून होते. या प्रयोगात स्वाभाविकपणे नियंत्रण पुढील गोष्टीमुळे घडून येत असल्याचे आढळून येते.

१. त्या स्त्री असल्यामुळे त्यांचे दंडापासूनचे पुढचे हात उघडे असतात. त्यामुळे बाह्यात काही लपवून ठेवण्याचा प्रश्न उपस्थित होत नाही.

२. संचार होताच त्या आपले हात उघडे करून दाखवतात व एकदा पुढे केलेले हात त्या दुसरीकडे कधीच नेत नाहीत वा त्यांची स्थिती बदलत नाहीत.

३. हातातून जपमाळ खाली पडताच संचार झाल्याचे सूचित होते व आता विभूती काढण्याचा प्रयोग होणार याची खात्री असल्यामुळे निरीक्षकांना आपले लक्ष केंद्रित करणे सोपे जाते. (संचार असूनही घुमणे, डुलणे, हातवारे करणे इ. प्रकार होत नसल्यामुळे हा विशिष्ट प्रकारचा संचार प्रयोगकर्त्यांच्या पथ्यावर पडतो, संचार अवस्थेत त्या बोलतात हे खरे आहे. पण विभूती काढून होईपर्यंत 'गोमूत्र शिंपडा' या खेरीज दुसरे काहीच बोलत नाहीत. प्रेक्षकांचे लक्ष विचलित करण्याचा त्यांनी प्रयत्न केल्याचे एकही उदाहरण नाही.)

४. जपमाळ खाली पडल्यानंतर व हात उघडे करून दाखवल्यानंतर त्या दोन्ही हात मिटतात व त्या हातांनी पूजासाहित्य व इतर कोणत्याही वस्तूला त्या कधीच स्पर्श करीत नाहीत.

वरील चार गोष्टी प्रत्येक प्रयोगात हमखास घडून येत असल्यामुळे प्रयोगाचे या चार पद्धतीने आपोआप नियंत्रण होते व प्रयोगकर्त्यांला हातावर लक्ष केंद्रित करणे सुलभ होते. चार वेळा हे प्रयोग पाहून प्रस्तुत लेखकाची खात्री झाली आहे की, बाईना स्वतःचे पातळ, ब्लाऊज इ. नेसण्यास देणे व आपल्या स्त्रीप्रतिनिधीपुढे ते

नेसावयास सांगणे, स्वतःचे पूजा साहित्य वापरण्यास सांगणे इ. गोष्टी अनावश्यक आहेत. कारण प्रत्यक्ष प्रयोगात या गोष्टींचा कोठेच संबंध येत नाही. हे प्रयोग अनुराधाबाईच्या सर्व बाजूंना उभे राहून निरनिराळ्या कोनातून पाहून व व्हिडिओने चित्रीकरण करून (यासाठी अनेक निरीक्षकांचा उपयोग केला आहे.) पाहिले असून त्यात संशयाला कोठेच जागा राहून दिलेली नाही. घेतलेल्या व्हिडिओ फिल्मचे 'स्लो-मोशन'नेही निरीक्षण केले आहे. स्थिर फोटोंचेही निरीक्षण केले आहे. (ही व्हिडिओ फिल्म व फोटो प्रस्तुत लेखकाकडे व 'पश्यंती' मध्ये उपलब्ध असून कोणालाही विनंतीवरून पाहण्यास मिळतील.) [12]

## निष्कर्ष

आतापर्यंत अनुराधाबाईच्या व अंधश्रद्धा निर्मूलनाच्या संबंधाने वृत्तपत्रातून प्रसिद्ध झालेल्या वृत्तांतावरून व वर दिलेल्या व प्रत्यक्ष घडलेल्या घटनाक्रमांवरून कोणीही सूज्ञ मनुष्य पुढील निष्कर्ष काढील.

१. अं. श्र. नि. समितीच्या कार्याध्यक्षानी अं. श्र. नि. समितीच्या जाहीर उद्दिष्टाप्रमाणे कार्य करण्यात अत्यंत अक्षम्य हलगर्जीपणा व कुचराई दाखवली आहे. यावरून अंधश्रद्धा निर्मूलनाऐवजी या समितीचे दुसरे काहीतरी उद्दिष्ट आहे, हे स्पष्ट होते.

२. अं. श्र. नि. समितीचे कार्य वैशनिक पद्धतीने चालत नाही तिच्या कार्यकर्त्याजवळ विज्ञानदृष्टी नाही. वैज्ञानिक सत्य शोधणे, हे या समितीचे उद्दिष्ट नाही.

---

१२. आम्ही काढलेली व्हिडिओ फिल्म कोणालाही विनंतीवरून पाहावयास मिळेल असे येथे जाहीर केलेले असतानाही 'अंनिस' ने आपल्या एका हस्तकाकरवी प्रा. कृष्णा गुरवांकडून ती लबाडीने मिळवली व त्याविषयी बरेच खोटेनाटे नंतर लिहिले आहे. यासंबंधी प्रस्तुत लेखकाने केलेला खुलासा परिशिष्ट १ व २ मध्ये वाचावयास मिळेल. खोटेपणाबद्दल कुप्रसिद्ध असलेल्या 'अंनिस' नी कपटनीतीही हे प्रकरण अशा रीतीने वेशीवर टांगते. (नंतर जोडलेली टीप)

३. अं. श्र. नि. समितीच्या कार्यकर्त्यांजवळ सामाजिक कार्यकर्त्यांजवळ आवश्यक असलेला नम्रता हा गुण नाही.

वरील निष्कर्ष शंभर टक्के बरोबर असल्याबद्दलचे पुरावे खाली देत आहे.

१. चमत्कार अशक्य आहेत अशी जाहीर भूमिका घेऊन (दैवी चमत्काराच्या नावाखाली बुवाबाजी चालते, अशी शंभर टक्के खात्री असल्यामुळे) असा चमत्कार करणाऱ्या बुवा लोकांविरुद्ध जाहीर मोहीम उपडलेल्या या लोकांनी एक बाई रिक्त हातातून विभूती काढते, असे कळताच तेथे धावून जाऊन हे थोतांड असल्याचे दाखवून देणे आवश्यक होते. हे कार्य त्यांनी केलेले नाही. **अनुराधाबाईंनी मसलेचौधरीला या चमत्काराची त्यांच्या अटीखाली तपासणी करण्यासाठी येण्याचे लेखी व खास दूताकरवी आमंत्रण देऊनही ते तेथे गेले नाहीत.** (या लोकांचे गुरु अब्राहम कोवूर सत्यसाईबाबांचा हाच चमत्कार पाहण्यास पुट्टपतीला धावून गेले होते. **पण बाबांनी कोवूरांना दरवाजाच्या आत येऊ दिले नाही.** हा इतिहास या घटनेशी ताडून पाहण्यासारखा आहे.) (याविषयी नंतर दाभोळकरांनी केलेल्या खोट्या लेखनाच्या व त्यांच्या प्रतिवादनाच्या माहितीसाठी **परिशिष्ट १ व २** पाहा)

२. अनुराधाबाईंनी आपला चमत्कार एखाद्या जिल्ह्याच्या ठिकाणी करून दाखवावा, असा आग्रह या लोकांनी का धरला याचे समर्पक कारण त्यांनी दिलेले नाही. पोलिस संरक्षण त्यांना पाहिजे असेल, तर ते त्यांना कोठेही मिळू शकले असते. (मसलेचौधरी येथे १५ मे रोजी अनुराधाबाईच्या विनंतीवरून मोहोळ - तालुक्याचे पोलिस उपनिरीक्षक श्री. कुलकर्णी पोलिस कुमक घेऊन हजर होते.)

३. आपले आव्हान स्वीकारले नाही तर अनुराधाबाई जनतेची फसवणूक असे 'समजून त्यांच्यावर योग्य ती पोलिस कारवाई करण्यात येईल, असे करतात, जाहीर पत्रक काढणाऱ्या या लोकांनी या घटनेला कित्येक महिने होऊन गेले तरी काहीच हालचाल केलेली नाही.

४. प्रथम एक लाख रुपयांचे बक्षीस जाहीर केलेल्या या लोकांनी आपल्या 'आव्हान प्रक्रिये' मध्ये वा 'मसुदा पत्रा' मध्ये एक लाख रुपयांच्या बक्षीसाचा चुकूनही उल्लेख केलेला नाही.

५. या लोकांनी चंदूर येथे अनुराधाबाईंना असभ्य प्रश्न विचारले. (याला अनेक लोक साक्षीदार आहेत. ते वार्ताहरांनाही माहीत आहे.) दिनकरराव शिंदे यांच्यापुढे समितीच्या कार्याध्यक्षांनी आपल्या घरी ते आले असता बाईंच्या बद्दल अनादरदर्शक भाषा वापरली.

वरील वस्तुस्थितीमुळे प्रस्तुत लेखकाने या लेखाच्या प्रारंभी केलेल्या विधानाला पूर्ण बळकटी मिळते. हे विधान म्हणजे "स्वतला विज्ञानवादी म्हणवून घेणाऱ्या या लोकांत वैज्ञानिक दृष्टिकोनाचाच मोठा अभाव आढळून येतो, हे होय. विज्ञानाचे उद्दिष्ट सत्यशोधन हे आहे. या लोकांना सत्य शोधायचे असते तर त्यांनी 'आव्हान प्रक्रियेचा किंवा 'आम्हान मसुदा पत्रा'चा घोळ घातला नसता. ते तडक मसलेचौधरीला गेले असते व सत्य स्थिती जाणून घेतली असती. चमत्कार अशक्य समजणाऱ्या या लोकांनी विश्वाचे रहस्य आपणच काय ते जाणतो असा आव आणून चमत्कार आपल्या समोर येऊन आपण सांगतो तेथे व तसे करून दाखवावा, असा हेका धरावा ही गोष्ट हे लोक स्वतला वैज्ञानिक सत्याचे मक्तेदार समजतात, असे सूचित करते. ही गोष्ट वैज्ञानिक संशोधनाची दृष्टी त्यांच्याजवळ नाही हे तर दाखवून देतेच, पण वैज्ञानिक संशोधन करण्यास ते पूर्णपणे अपात्र आहेत, हेही सिद्ध करते. अशा लोकांनी समाजाच्या अंधश्रद्धा निर्मूलनाचे कार्य करावे यापेक्षा मोठा विनोद कोणता असू शकेल?

**टीप** - अंधश्रद्धेमुळे सामाजिक प्रगती खुंटते, हे विधान हल्लीच्या विज्ञानयुगीन समाजाला मुळीच लागू होत नाही. हल्लीच्या विज्ञानयुगीन समाजात अंधश्रद्धा ही माणसाची एक खासगी बाब बनली असून सामाजिक प्रगतीच्या दृष्टीने तिचा समाजावरील परिणाम नगण्य आहे. अंधश्रद्धेमुळे किती लोक हकनाक मृत्युमुखी पडले आहेत, याचा आढावा घेऊन त्याची वैद्यकीय हलगर्जीपणामुळे किंवा दारू पिऊन वा तंबाखू सेवन केल्यामुळे, या हलगर्जीपणाने वाहन हाकल्यामुळे होणाऱ्या अपघातात दररोज मृत्युमुखी पडणाऱ्या लोकांच्या आकडेवारीशी तुलना केली तर ही गोष्ट स्पष्ट होईल. आपल्या देशात रस्त्यावरील अपघातात दररोज ६०० लोक मरण पावतात. (ही १९८८ सालची आकडेवारी आहे.) तसेच अंधश्रद्धेमुळे किती लोक नाडले गेले आहेत, किती रकमेला नाडले गेले आहेत व किती मांत्रिक अंधश्रद्धेचा

फायदा घेऊन श्रीमंत झाले आहेत, किती जलद व किती प्रमाणात झाले आहेत, याची आकडेवारी काढली व तिची लाचलुचपत, चोरटा व्यवहार, राजकीय भ्रष्टाचार व बोफोर्ससारख्या) राष्ट्रीय पातळीवर चालणारा आर्थिक गैरव्यवहार यामुळे होणाऱ्या राष्ट्रीय नुकसानीच्या आकडेवारीशी तुलना केली, तर अंधश्रद्धेच्या राईचा हे लोक पर्वत करीत आहेत, ही गोष्ट स्पष्ट होते. अं. श्र. नि. स. च्या लोकांचा हा गाजावाजा म्हणजे दिवाळीत मुले उडवणाऱ्या ॲटमबॉबला खरा ॲटमबॉब समजून गहजब करण्यासारखे आहे (आणि खऱ्या ॲटमबॉबकडे दुर्लक्ष करण्यासारखे आहे !) या लोकांनी करण्यासारखी कामे बरीच असताना नको त्या गोष्टीत व जे प्रश्न आपल्यापुढे नाहीत, त्याची उत्तरे शोधण्यात आपली शक्ती व वेळ हे लोक वाया घालवीत आहेत असे दिसून येते. अनेक जत्रेमध्ये मोठ्या प्रमाणात पशुहत्या होत असते, ही गोष्ट मशहूर आहे. पण तेथे हे लोक कधी गेल्याचे ऐकिवात नाही. त्याऐवजी शहरात चार पोरे गोळा करून त्यांना लैंगिक शिक्षण देणे, किंवा एखाद्या खेड्यात जाऊन अंगाला लिंबे टोचून घेऊन बनावट त्रिशूल जिभेला अडकवून किंवा विस्तवावरून उड्या मारून दाखवून त्यांची वृत्तपत्रात बातमी येईल, याची काळजी घेण्यात हे लोक धन्यता मानताना दिसून येतात ! समाजातील हुंड्याच्या प्रश्नाकडे किंवा पैशासाठी सासरी होणाऱ्या मुलींच्या छळासारख्या ज्वलंत सामाजिक प्रश्नाकडे या लोकांचे कसलेच लक्ष जाऊ नये, याचे आश्चर्य वाटते. बुद्धिवादाच्या व विज्ञानवादाच्या दृष्टीने त्या समस्याच नाहीत की काय? (**अनुलेख** :- हा लेख प्रसिद्ध झाल्यानंतर या लोकांनी जत्रेत होणाऱ्या पशुहत्येकडे लक्ष दिले असल्याचे आढळून आले आहे.)

**अनुराधा देशमुखांच्या विभूती चमत्काराविषयीची सत्यस्थिती***

परिशिष्ट १

**अनुराधा देशमुखांच्या विभूती चमत्काराविषयीची सत्यस्थिती* ***

अबकडई १९९५ च्या अंकात डॉ. नरेंद्र दाभोळकरांनी अनुराधा देशमुखांविषयी बराच विपर्यस्त व खोटा मजकूर लिहिला आहे. त्यातील काही विधाने पुढीलप्रमाणे आहेत :

पहिले विधान : " आव्हान स्वीकारले म्हणून सांगण्यास आलेल्या दिनकरराव शिंदे यांची भलतीच पंचाईत झाली. "

वास्तविक श्री. दिनकरराव शिंदे दाभोळकरांना "मसले चौधरीला येऊन आपल्याच अटीखाली विभूती चमत्काराची प्रत्यक्ष तपासणी करावी' अशा आशयाचे खुद्द अनुराधा देशमुखांचे आमंत्रण पत्र घेऊन आले होते. त्यांची कसली पंचाईत होणार? आणि कसली पंचाईत झाली हे दाभोळकर का सांगत नाहीत? वास्तविक खास दूताकरवी आलेल्या अनुराधाबाईंच्या या लेखी आमंत्रणामुळे खुद्द दाभोळकरांचीच 'भलतीच पंचाईत' झाली होती! दाभोळकर आपला पळपुटेपणा लपवण्यासाठी उलट शिंदेंच्याविषयी असे खोटे लिहितात व स्वतच्री पंचाईत झालेली असताना शिंदेची पंचाईत झाली (कसली हे न सांगता) असे खोटेच म्हणतात. त्या आमंत्रण पत्रानुसार ते मसले चौधरीला का गेले नाहीत? वरील विधानानंतर ते लगेच दुसरे विधान करतात.

* (मुंबईहून निघणाच्या अबकडई या श्री. चंद्रकांत खोत संपादित १९९६ च्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झालेले पत्र )

दुसरे विधान: "म्हणून सोक्षमोक्ष लावण्यासाठी रजिस्टर पोचपावतीने हे आव्हान अनुराधा देशमुखांच्या नावाने मसले चौधरीला पाठवले."

अहो, ज्या अनुराधाबाई तुम्हाला तुमच्या कोणत्याही अटीखाली आपल्या विभूती चमत्काराची प्रत्यक्ष तपासणी करावी असे स्वाक्षरीने आपल्या खास दूताकरवी तुम्हाला लेखी आमंत्रण देतात, त्या अनुराधाबाईंना तुम्ही परतपावतीने टपालाने कसले 'आव्हान' देता व कसला 'सोक्षमोक्ष' लावता? सत्याला सामोरे जाण्याचे आपल्यात धैर्य नाही हेच टपालाच्या 'पोचपावती'चे हे नाटक दाखवून देत नाही काय? हे मी दाभोळकरांना अशासाठी विचारत आहे, की ज्या अमावस्येच्या दिवशी म्हणजे १५ मे १९८८ रोजी अनुराधाबाईनी आपल्या विभूतीचमत्काराची तपासणी करण्याचे आमंत्रण दाभोळकरांकडे सातान्याला खास दूत पाठवून लेखी दिले होते, त्या अमावस्येच्या दिवशी मसले चौधरी येथील विभूती चमत्काराच्या प्रयोगाला प्रस्तुत लेखक दाभोळकर येतील म्हणून तेथे जातीने वाट पाहत होता.

दाभोळकरांसाठी आम्ही पूजाविधी मुद्दाम लांबणीवर टाकला होता व प्रत्यक्ष जेव्हा दिनकरराव शिंदे आले व दाभोळकर येणार नाहीत असे त्यांनी सांगितले, तेव्हाच पूजाविधीला सुरुवात करण्यात आली. दाभोळकर येणार नाहीत असे जेव्हा कळले तेव्हा आमंत्रणानुसार ते येतील म्हणून मुद्दाम बोलावून घेतलेले मोहोळ तालुक्याचे फौजदार व तहसिलदार व इतर पोलिस या सर्वांचीच घोर निराशा झाली. यात शिंदेंची काय पंचाईत झाली हे दाभोळकर सांगतील काय? व 'पोचपावती'ने आणखी कसला 'सोक्षमोक्ष' ते लावणार होते हेही ते सांगतील काय? "कोणत्याही अटीखाली प्रत्यक्ष जाग्यावर येऊन चमत्काराची तपासणी करा" हे अनुराधाबाईंचे  खास दूताकरवी पाठविलेले लेखी आमंत्रण स्वीकारून 'सोक्षमोक्ष' लागतो, की 'पोचपावतीने' आव्हान देऊन तो लागतो हे दाभोळकर सांगतील काय? पण हे त्यांनी सांगण्याची जरूरी नाही. कारण त्यांना या विभूती चमत्कारातील सत्य शोधून त्या चमत्काराचा 'सोक्षमोक्ष' मुळी लावायचाच नाही. त्यांना अनुराधाबाई चमत्कार सिद्ध करण्याचे समितीचे आव्हान कशा स्वीकारत नाहीत, व जनतेला कशा फसवतात हे अं. नि. स. चे 'खास' 'सत्य' सिद्ध करायचे आहे! त्यासाठीचा ही 'भलतीच पंचाईत,' 'पोचपावती'चे आव्हान व 'सोक्षमोक्ष' ची भाषा! पुढचे दाभोळकरांचे तिसरे विधान असे आहे.

तिसरे विधान : " अर्थात, त्याचे उत्तर देण्याची हिंमत त्यांनी आजतागायत दाखवली नाही."

अहो, ज्या अनुराधा देशमुख तुम्हाला खास दूतामार्फत लेखी आमंत्रण देतात व त्यासाठी - सुरक्षिततेसाठी तालुक्याहून पोलिस उपनिरीक्षक, तहसिलदारमसले चौधरीला बोलावून घेतात, त्या अनुराधा देशमुखांच्या कसल्या उत्तराची आपण अपेक्षा करता? त्यांच्या “उत्तर देण्याच्या हिंमती'ची भाषा करण्यास आपणास काहीच कसे वाटत नाही? सत्याला सामोरे जाण्याची स्वतजवळ हिंमत नसताना अनुराधाबाईंच्या जवळ उत्तर देण्याची हिंमत नाही, हे कोणत्या तोंडाने तुम्ही म्हणता? पुढे दाभोळकरांचे चौथे विधान आहे.

चौथे विधान : "२२ जून १९९० ला खुद्द बाईंच्या गावी जाऊन त्यांनी चमत्कार सिद्ध करावेत यासाठी समितीने निदर्शने केली." (वरील सर्व विधाने अबकडई १९९५ च्या दिवाळी अंकाच्या पृष्ठ १५९ वर आहेत.)

जी व्यक्ती अनुराधाबाईच्या विभूतीच्या चमत्काराची तपासणी करण्यासाठी त्यांच्या खास दूताकरवी केलेल्या लेखी आमंत्रणानुसार मसलेचौधरीला जात नाही, ती व्यक्ती दोन वर्षांनी 'चमत्कार सिद्ध करा' म्हणून 'निदर्शने' करण्यासाठी आपल्या पाठीराख्यांचा घोळका जमवून जाते यातील विनोद कुणालाही कळण्यासारखा आहे. त्यावर टीकाटिप्पणी करण्याची आवश्यकता नाही. 'निदर्शना'ने चमत्कारातील सत्य कळते ही ज्यांची 'वैज्ञानिक जाण' आहे, त्यांच्याविषयी काय बोलावे?

आपल्या खास आमंत्रणाला ज्या व्यक्तीने प्रतिसाद दिला नाही, व्यक्तीच्या 'निदर्शना'ला कोणती स्वाभिमानी व्यक्ती भीक घालील ? अनुराधाबाईंनी त्या या 'निदर्शना'ला मुळीच भीक घातली नाही आणि दाभोळकरांना तेच हवे होते. कारण बाई आपली फसवणूक उघडकीस येईल म्हणून भ्याल्या', असा डिंडिम पिटण्याची दाभोळकरांना संधी हवी होती, ती त्यामुळे त्यांना मिळाली! निदर्शन यशस्वी झाले! म्हणून दाभोळकरांनी पुढील पाचवे विधान केले आहे.

पाचवे विधान : "अनुराधाबाईंनी कधीही आव्हान प्रक्रिया चोखपणे पार पाडण्यास सहकार्य दिले नाही.' " आहे की नाही गंमत? खोटे बोलण्याला काही मर्यादा ? दाभोळकरांनी पुढे सहावे विमान केलेले आहे.

सहावे विधान : "मात्र काही पत्रकार हाताशी धरून अधूनमधून आपला डिंडिम वाजवणे चालूच ठेवले. "

अनुराधाबाईना आपला डिंडिम वाजविण्याची कधीच गरज वाटलेली नाही. सत्याचा डिंडिम वाजवावा लागत नाही. डिंडिम वाजवावा लागतो असत्याला. त्यासाठी पत्रकारांना हाताशी धरावे लागते. हा उद्योग दाभोळकर 'अंनिस'च्या नावाने नेहमीच करीत असतात हे जगजाहीर आहे. त्यासाठीच आणि त्यावरच 'अंनिस'चे महाराष्ट्रातील अस्तित्व अवलंबून आहे. पुरोगामित्वाच्या नावाखाली पत्रकारांनी (व त्यांच्या वृत्तपत्रांनी) 'अंनिस'चा डिंडिम वाजवला नसता, तर तिचे महाराष्ट्रातील अस्तित्व केव्हाच संपुष्टात आले असते. तिची नामोनिशानीही राहिली नसती. ती टिकविण्यासाठी धडधडीत खोटे लिहिणे, जेथे ते अगदीच वाईट दिसते त्या ठिकाणी खरे लपविणे व खोटे सुचविणे (suppressio veri and suggestio falsi) हे तंत्र

दाभोळकर आणि कंपू नेहमी वापरत असतात. अबकडई मधील आपल्या लेखात या दोन्ही तंत्रांचा दाभोळकरांनी मुक्त हस्ताने वापर केला आहे. ते सर्व उघड करून दाभोळकरांचे बेगडी स्वरूप वाचकांपुढे मांडण्याचा या मर्यादित टिपणाचा उद्देश नाही. पण अनुराधा देशमुखांच्या प्रकरणातील वर निवेदन केलेल्या वस्तुस्थितीवरून दाभोळकरांच्या लेखणीलाघवाची वाचकांना पुरेशी कल्पना येईल व त्यांचे कोणतेही विधान ते डोळे झाकून कधीच स्वीकारणार नाहीत. असा विश्वास वाटतो.

-अद्वयानंद गळतगे

## परिशिष्ट २

## डॉ. दाभोळकरांना प्रा. गळतगे यांचे पत्र

अद्वयानंद गळतगे (निवृत्त प्राचार्य ) भोज (बेळगाव) कर्नाटक

२६ जुलै १९९६

डॉ. नरेंद्र दाभोळकर, सातारा यांना स. न.

आपण 'अंधश्रद्धा विनाशाय' या नावाचे एक पुस्तके लिहिले असून त्यात अनुराधाबाईंच्या विभूती चमत्कारासंबंधी एक प्रकरण आहे. त्यात माझ्यासंबंधी काही विधाने आपण केली असून आपण किती बेजबाबदारपणाने व खोडसाळपणे लिहिता हे ती विधाने दाखवून देतात. आपली प्रतिमा खरे लिहिण्याबद्दल कधी प्रसिद्ध नाही. तथापि, वाचकांची दिशाभूल होऊ नये म्हणून ज्यांच्याबद्दल आपण खोटे लिहिता त्यांना आपल्याला जाब विचारण्याचा व सत्यस्थिती वाचकांपुढे आणण्याचा उद्योगही आपण कायमचाच लावून दिला आहे. हा उद्योग मला माझ्या इच्छेविरुद्ध पण आपले 'समाजकार्य' नीट चालावे म्हणून करावा लागत आहे. म्हणून मी या पत्राद्वारा आपल्याला आपण आपली विधाने खरी असल्याचे सिद्ध करावे अन्यथा पुढील आवृत्तीतून ती विधाने गाळावीत हे सांगू इच्छितो. यापैकी आपण काहीही केले नाही तर आपल्याला सत्याची कसलीही चाड वा मुर्वत नाही व अंधश्रद्धा निर्मूलनाच्या नावाखाली आपण असत्यप्रचाराचा धंदा चालवला आहे, असा निष्कर्ष काढावा लागेल.

(१) पहिला संदर्भ माझ्या नावापासूनच सुरू होतो. माझे नावसुद्धा नीट वाचता व लिहिता न येणाऱ्या आपल्यासारख्या व्यक्तीला माझ्याविषयी नीट व खरे लिहिता आलेले नाही यात आश्चर्य कसले? कदाचित बुद्धिपुरस्सरही आपण माझे नाव विकृत केले असणे शक्य आहे. कसेही असो, माझे नाव नीट लिहावे.

(२) समितीच्या कामावर मी 'गरळ ओकली असे आपण म्हटले आहे. ती गरळ कोणती हे का सांगितले नाही? नुसते मोघम विधान हे वाचकांची दिशाभूल करण्यासाठीच आहे असे ठरत नाही काय? मी जे लिहिले आहे ते 'विज्ञानाच्या प्रसाराबरोबर अंधश्रद्धा कमी होतात' या तर्कशुद्ध व शास्त्रीय विचारसरणीवर आधारलेले आहे. हे आपण खोटे म्हणू शकता काय? विज्ञानाचा प्रसार पूर्वीच्या काळापेक्षा आता कमी होत आहे वा झाला आहे असे आपले म्हणणे आहे काय? किंवा विज्ञानाचा प्रसार होऊनही अंधश्रद्धा पूर्वीपेक्षा जास्तच वाढत आहेत, असे आपले म्हणणे आहे काय? असे आपले म्हणणे असेल तर हे आपण सिद्ध करावे, अन्यथा 'गरळ' हा शब्द असलेले माझ्यासंबंधीचे विधान काढून टाकावे.

(३) अनुराधाबाईंची भरपूर 'भलावण' माझ्या लेखात आहे असे आपण म्हटले आहे. 'भलावण' याचा अर्थ होतो लायकी नसताना चांगले म्हणणे. या अर्थाने माझ्या लेखात अनुराधाबाईंची मुळीच भलावण नाही, हे वाचकांना माझा लेख पूर्ण वाचल्यानंतर खात्री पटेल. म्हणून हे विधानही वाचकांची दिशाभूल करण्यासाठीच आपण केले आहे असे म्हणावे लागते. मी अनुराधाबाईविषयी काय खोटे लिहिले आहे हे सिद्ध करावे, अन्यथा हे विधानही काढून टाकावे.

(४) " लेख वाचल्यानंतर वाचकांस त्यातील उघड पक्षपाती दृष्टिकोन वेगळा समजावून सांगण्याची गरजच नव्हती. ज्या पद्धतीने बाई विभूती काढले असा त्यांचा दावा होता, त्या पद्धतीची काटेकोरपणे चाचणी देण्यासही खरे तर तिचा नकार होता. ही वस्तुस्थितीही दडवून लेखात भलतेच मांडले होते." या विधानातील 'उघड पक्षपात' हे शब्द सिद्ध न करताच आपण वापरले असून ते आपण वापरले म्हणूनच केवळ वाचकांनी ते खरे धरून चालावे अशी आपली अपेक्षा आहे. अनुराधाबाईंचा चमत्कार खोटा हे सिद्ध न करताच आपण एक पक्ष धरला आहे, हा पक्षपातीपणा नव्हे काय? अनुराधाबाईनी चाचणी देण्यास कधी नकार दिला आहे, हे वाचकांना

आपण कोठे सांगितले आहे काय? न सांगताच हा आरोप बाईवर आपण करत आहात हा पक्षपातच नव्हे, तर बाईंवर धडधडीत अन्याय आहे. बाईंचा चाचणीला नकार होता ही वस्तुस्थिती मी दडवली आहे हे आपले म्हणणेच वस्तुस्थिती दडवणारे आहे. कारण माझ्या लेखात दिनकरराव शिंदे हे बाईंचे खास दूत म्हणून बाईंच्याकडून आपल्या घरी सातान्याला बाईंचे खास लेखी आमंत्रणपत्र घेऊन आले होते. व या आमंत्रणपत्रात आपल्या अटींखाली माझी आपण चाचणी घेऊ शकता, त्यासाठी १५ मे १९८८ च्या दिवशी, म्हणजे अमावस्येला मसले चौधरीला यावे अशी आपल्याला बाईंनी विनंती केली होती. हा सर्व तपशील माझ्या लेखात दिलेला असताना "बाईंची चाचणीला संमती नव्हती ही वस्तुस्थिती दडवून लेखात भलतेच (मी) मांडले आहे" असे आपण कसे म्हणता? वाचकांची माझ्याविषयी व माझ्या लेखाविषयी दिशाभूल करण्याच्या उद्देशानेच हे खोटे विधान आपण केलेले असल्याने तेही काढून टाकावे.

(५) पुढे आपण बाईच्या चित्रफितीविषयी म्हटले आहे की "पश्यंती विद्यालयातील पूजेची आणि दुसरी कोल्हापुरातीलच एका घरातील अशा दोन पूजा त्यात होत्या." (या वाक्यातील 'विद्यालय' कुठून आले? 'विद्यावलय' हेसुद्धा नीट लिहिता न येणाऱ्या आपल्याकडून कसल्या 'काटेकोरपणा'ची अपेक्षा करावी ?) वास्तविक माझ्या लेखात मी पिंपरी-पुणे येथे ही दुसरी फिल्म पूजेची - घेतल्याचे माझ्या लेखात स्पष्ट म्हटलेले असताना "कोल्हापुरातीलच एका घरातील" ही पूजा होती हा जावईशोध आपण कसा लावला ? या आपल्या 'शोधा'वरून माझा लेख आपण किती काळजीपूर्वक वाचून त्यावर टीका केली आहे हे स्पष्ट होते. आपण पुढे म्हटले आहे ‘खरे तर अशा प्रयोगात कॅमेरा सतत 'लक्ष्यावर’ रोखलेला हवा. पण इथे कॅमेरा निवांत इकडे तिकडे कुणावरही फिरत असे. अनुराधाबाईचा हात मुळी अखंड कॅमेऱ्यापुढे नव्हताच. " हे धडधडीत खोटे विधान आहे. "कोल्हापुरातीलच एका घरात" असे आपण ज्या फिल्मविषयी म्हणता त्यां फिल्ममध्ये ही अट काटेकोरपणे पाळलेली असताना त्या फिल्मबद्दल आपण चकार शब्द का काढत नाही? माझ्या लेखात मी या पिंपरी पुणे येथे घेतलेल्या फिल्मविषयीच लिहिले असून बाईंच्या "दोन्ही हातांवरचा कॅमेरा किंचितही ढळू न देण्याची प्रमुख सूचना त्याला (कॅमेरामनला) कटाक्षाने पाळण्याची ताकीद देण्यात आली," असे मी माझ्या लेखात

स्पष्ट विधान केले असून (पैलतीर- १९८८ पृ. ६९) ही सूचना त्याने काटेकोरपणे अंमलता आणली असल्याचे ती फिल्म पाहणाऱ्या कोणाच्याही लक्षात येईल. असे असताना या फिल्मचा आपण उल्लेख न करता वरीलसारखे वाचकांची दिशाभूल करणारे विधान आपण केले असल्याने तेही काढून टाकावे व संदर्भ सरळ लिहावा.

(६) पुढे आपण अनुराधाबाईविषयी असे विधान केले आहे "तथाकथित संचार अवस्थेत अनुराधाबाईंचे दोन्ही हातांचे तळवे नमस्कारासाठी जुळत. त्याची मागची बाजू अंगावरच्या भरजरी साडीच्या पदराच्या काठावर टेकली जाई. पदराच्या काठाच्या आत काही दडवले असावे अशी बरीचशी शक्यता चित्रफीत बघताना जाणवत होती. ही "पदराच्या काठाच्या आत काहीतरी दडवले असण्याची शक्यता" आपल्यालाच जाणवते, की ही चित्रफीत पाहणाऱ्या कुणालाही जाणवते हे या विधानावरून स्पष्ट होत नाही. हे आपल्यालाच जाणवत असेल तर हे विधान शुद्ध खोडसाळपणे आपण केलेले व म्हणून खोटे आहे; आणि ते विनातक्रार काढून टाकावे. आणि ते कुणालाही जाणवते असे आपले म्हणणे असेल, तर निःपक्ष लोकांसमोर ही चित्रफीत मी सार्वजनिक ठिकाणी दाखवण्यास तयार आहे. आपण हे ठिकाण, तारीख व वेळ कळविले तर त्या ठिकाणी व त्या वेळी विज्ञानविषयातील तज्ज्ञांना आपण बोलावून घेऊन हा जाहीर कार्यक्रम करू शकतो. था जमलेल्या मंडळींपैकी काही मोजक्या लोकांनी जरी ही दडवण्याची शक्यता जाणवते असे बोलून दाखवले, तरी वरील आपले विधान मी विनातक्रार पुस्तकात राखू देण्यास तयार आहे. पण ही शक्यता नाही असे सर्वानुमते ठरले तर आपल्याला वरील विधान काढून टाकावे तर लागेलच, पण असे खोडसाळ विधान केल्याबद्दल वृत्तपत्रातून जाहीरपणे दिलगिरी व्यक्त करावी लागेल व तसे हमी पत्र लेखी मला अगोदर लिहून द्यावे लागेल. ही तज्ज्ञमंडळी, सार्वजनिक ठिकाण, वेळ इ. उभयमान्य व सोयीनुसार ठरवता येईल. आपल्याकडून याविषयी काहीच कळले नाही, तर मी माझा निष्कर्ष काढण्यास मोकळा असेन.

आणखीही बरेच असंबद्ध व खोटे (विशेषतः प्रा. गुरव यांच्याशी केलेल्या पत्रव्यवहाराविषयी आपण लिहिले आहे. त्या सर्वाविषयी येथे लिहिणे हे मी कालाचा

अपव्यय समजतो व पत्र येथेच आवरते घेतो. विशेषतः भिंत धुवावी तितकी राडच निघते ही कानडी म्हण लक्षात घेऊन. कळावे,

-आपला अद्वयानंद गळतगे

टीप : (या ग्रंथाच्या प्रकाशनाच्या वेळी जोडलेली) : डॉ. दाभोळकर आपल्या उपर्युक्त पुस्तकाच्या पुढील आवृत्तीत प्रस्तुत पत्रातील सूचनांची कसलीच दखल न घेता किंवा दखल घेऊनही, असे आपल्याला गळतग्यांनी कधी पत्र लिहिलेच नाही, लिहिले असेल तरी ते आपल्याला मिळालेच नाही असे कदाचित म्हणतील. म्हणून वाचकांना सांगू इच्छितो, की त्यांना रजिस्टर (ए. डी.) करून पत्र पाठविले तर ते Refused अशा पोस्टाच्या शेऱ्याने परत येते असा अनुभव असल्यामुळे वरील पत्र मुद्दाम साध्या पोस्टाने मी पाठविले आहे. माझी साध्या पोस्टाने पाठविलेली पत्रे त्यांना नेहमी पोचत असल्याचा पुरावा माझ्याजवळ आहे. (त्यांनी विंग कमांडर शशिकांत ओक यांना लिहिलेल्या एका पत्राच्या रूपात. ) प्रसंग पडल्यास तो मी सादर करीन.

## परिशिष्ट ३

## अनुराधाबाईंच्या विभूती चमत्काराविषयी प्रा. अकोलकरांशी झालेला पत्रव्यवहार

अद्वयानंद गळतगे

भोज (बेळगाव) कर्नाटक २ जून १९९४

सन्माननीय प्रा. व. वि. अकोलकर यांना, सा. न. वि. वि.

१९ मे रोजी आपल्याकडे आलो असता आपण जी चिकित्सक दृष्टीने चर्चा केली (तीमध्ये) अनुराधा देशमुखांच्या विभूती- चमत्काराबाबत आपण आजही संशयवादी आहात हे पाहून आश्चर्य वाटले. हा संशय आपण कशाच्या आधारे घेता हे मात्र स्पष्ट होत नाही. आपल्या एका प्राध्यापक स्नेह्याने बाईंच्या साडीवर विभूतीचा खडा पडल्याचे पाहिल्याचे आपण म्हटले आहे. हे खरे असेल तर तो पाहिला तेव्हा ते प्राध्यापक गप्प का बसले? तो खडा कुठून आला याची त्यांनी चौकशी का केली नाही?

त्याबाबत 'भाऊ'ना अगर बाईंना छेडले का नाही? या. पुराव्याच्या आधारे बाईंना expose का केले नाही? इ. प्रश्न या संदर्भात निर्माण होतात. तसेच आपण कोणा दुकानदाराने बाईंच्या घरी खडूची पेटी दिल्याचा उल्लेख केला आहे. हा बाईच्या चमत्काराच्या खरेपणाविषयी संशय निर्माण करणारा 'शास्त्रीय पुरावा' म्हणता येईल काय? आपण तो तसा मानता काय? हा प्रश्न विचारावासा वाटतो. खडू हातात धरून त्याची बोटांनी दाबून विभूती करता येते काय ? त्यासाठी खडूपेक्षा विभूतीच्या उंड्या अधिक सोयिस्कर नाहीत काय ? खडू दिल्याचे सांगणाऱ्याची विश्वासार्हता आपण तपासली आहे काय? इ. प्रश्नही यासंदर्भात महत्वाचे आहेत.

आपण स्वत: बाईंचा प्रयोग प्रत्यक्ष पाहून हा प्रयोग चमत्कार खराही - म्हणता येणार नाही व खोटाही म्हणता येत नाही.' असे विधान केल्याचे मान्य केले आहे. (मग हे विधान 'भाऊ' जवळ अथवा बाईंजवळ केले नसेल, बेडेकरांजवळ केले असेल. पण ते केल्याचे आपण मान्य केले आहे.) या विधानाचा अर्थ आपण बाईचा प्रयोग प्रत्यक्ष पाहूनही आपले त्याविषयीचे निश्चित मत बनवू शकला नाही असा होतो. तसे मत आपण का बनवू शकला नाही याचे कारण प्रयोगातील loophole - मात्र आपण सांगितलेले नाही. ते सांगितलेले नसल्यामुळे आपले उपर्युक्त तृतीयपंथी विधान (suspended judgement) कसे स्वीकारता येईल ? आपण बाईंनी किती वेळा विभूती दिली याची नोंद करून ती संख्या ६१ भरल्याचे म्हटले आहे. त्यानंतर त्यांनी विभूती देण्याचे बंद केले, कारण हातातील विभूतीचा खडा संपला असावा, असे सूचित करून म्हटले आहे. हे आपले विधान करण्यापूर्वी ६१ लोकांना देण्याइतक्या विभूतीचा खडा हातात मुठीत ठेवता येतो का, हे ठरवावे लागेल. तसेच तो खडा बाईंनी कोणत्या वेळी व कुठून हातात घेतला व तो घेताना कोणता ruse (लबाडी वा क्लृप्ती) वापरला हे आपण सांगितले पाहिजे. तसेच त्याच हातातून प्रथम (लाल) गुलाल व नंतर (पांढरी) विभूती, रुद्राक्ष इ. वस्तू कशा येतात हेही सांगितले पाहिजे. कारण या गोष्टी मी प्रत्यक्ष पाहिल्या आहेत. तसेच हाताची इकडे तिकडे हालचाल न करता दिवसभर शेकडो लोकांना विभूती देण्याचे काम बाई प्रत्येक अमावस्येच्या दिवशी आपल्या गावी करतात, हे मी दोन अमावस्यांना तेथे उपस्थित राहून पाहिले असल्याचे म्हण शकतो. अर्थात, माझ्यावर आपण विश्वास ठेवावा असे

माझे म्हणणे नाही. पण आपल्या ज्या दोन विश्वासू प्राध्यापकांना आपण माझ्याबरोबर पिंपरी येथे पाठविले होते, त्यांनी तर हा प्रयोग प्रत्यक्ष पाहिला आहे ना?* तसेच बिब्बेवाडी येथे आपणही हा प्रयोग प्रत्यक्ष पाहिला आहे ना? या दोन्ही प्रयोगाच्या वेळी बाईंनी विभूतीचा खडा केव्हा कुठून घेतला व त्यासाठी कोणता ruse वापरला हे शोधून काढले आहे काय? असेल तर ते आपण सांगितलेले नाही. आणि नसेल तर कोणत्या गोष्टीच्या आधारे बाईंच्या प्रयोगाविषयी संशयवाद स्वीकारता हे स्पष्ट केलेले नाही. जे. बी. ऱ्हाईन यांनी टेड सिरिओसच्या thoughtography चा प्रयोग प्रत्यक्ष कधीच पाहिला नव्हता. तरीही त्या प्रयोगाविषयी कधी संशय बाळगला नाही. तो प्रयोग पाहिलेल्या ज्यूल आयसेनबडवर पूर्ण विश्वास ठेवला व मार्टिन गार्डनरसारख्या कट्टर संशयवाद्याला (बुद्धिवाद्याला ) आपला आयसेनबडवर पूर्ण विश्वास असल्याचे पत्राने ठणकावून सांगितले. आपण मात्र बाईचा प्रयोग

* तळटीप : ही १९९४ साली पत्र लिहिले त्यावेळची गोष्ट आहे. त्या संख्येत आता (१९९७) पुन्हा भर पडली आहे.

प्रत्यक्ष पाहूनसुद्धा त्यावर विश्वास ठेवत नाही अगर त्यातील loophole अथवा ruse दाखवून देत नाही, याचे आश्चर्य वाटते. 'माझ्या अटींखाली पुन्हा एकदा प्रयोग करा अशी विनंती आपण बाईंना केली असती तर समजू शकले असते. तसेही आपण बाईंना सांगितलेले नाही.

आपण बाईच्या प्रयोगाची व्हीडिओ फिल्म परत पाठविण्याचे आश्वासन देऊनही मी ती आपल्याला पाठवली नाही, असे आपण मला म्हटले, आपले दोघे विश्वासू प्राध्यापक प्रत्यक्ष त्या प्रयोगाला हजर असल्यामुळे त्या प्रयोगाचा खरेखोटेपणा ठरविण्याच्या दृष्टीने ते प्राध्यापक लोक महत्त्वाचे, फिल्म नव्हे, असे मला वाटल्यामुळे मी ती फिल्म आपल्यास पाठविली नाही हे खरे आहे. पण बाईंचा प्रयोग प्रत्यक्ष आपण स्वतःपाहूनही त्याचा खरे-खोटेपणा ठरवू शकलेला नसल्यामुळे मी फिल्म न पाठविण्यात फार मोठी चूक केली असे आता वाटत नाही. तथापि आपण बाईंच्या प्रयोगातील loophole दाखवून देऊ शकत असाल, तर १९ तारखेला मी आपल्याला ती फिल्म दाखविण्याचे आपल्या घरी जे वचन दिले आहे, त्याला

आजही मी बद्ध आहे. (बाईंना खडूची पेटी दिली असे म्हणणाऱ्यांचे नाव व पत्ता माहीत असल्यास कळवल्यास बरे होईल. ते शक्य नसेल तर ही माहिती आपणास कोणाकडून मिळाली हे तरी कृपया नाव व पत्त्यानिशी कळवावे.)

॥ श्री ॥

आपला स्नेहांकित, अद्वयानंद गळतगे.

स्वरमाला, कर्वे रोड,

पुणे - ४

ता. ५ जून १९९४

स्नेही श्री. प्रा. गळतगे यांस, सप्रेम नमस्कार वि. विशेष

२ जून ९४ चे पत्र मिळाले. तुम्ही उपस्थित केलेले मुद्दे महत्त्वाचे आहेत. प्रकृती बरी नसल्याने थोडक्यात पत्रोत्तर लिहित आहे.

श्रीमती अनुराधाबाईंच्या बाबतीत मी वाईट अर्थाने संशयवादी नाही. प्रयोगात्मक अथवा प्रयोगसदृश नियंत्रित प्रसंग मिळाला नाही तोपर्यंत suspension of judgement ही भूमिका मी, प्रा. डॉ. भरत देसाई, प्रा. गायकवाड व श्री. धु. ह. बेडेकर यांनी बाळगली. त्यात काही वावगे नाही असे वाटते. पिंपरी येथे प्रा. डॉ. देसाई व गायकवाड होते. त्यांना निश्चित मत बनवण्याजोगी परिस्थिती नव्हती. म्हणून तर तुमच्या video tape ची आवश्यकता वाटली. तो वेळीच मिळाला असता तर त्या आधारे मत बनवता आले असते व तुम्हास कळवलेही असते. ज्या प्रकारचा प्रयोगसदृश प्रसंग हवा होता, तसा प्रसंग कोल्हापूर येथे मिळाला व शेकडो जणांना विभूती मिळाली असे ता. १९ मे रोजी डॉ. सी. बी. देसाई यांनी सांगितले तेव्हा कळले. ही हकीकत पूर्वीच कळाली असती तर video घ्या आणि डॉ. देसाई यांनी सांगितलेल्या हकीकतीच्या आधारे अस्तिपक्षी मत व्यक्त करता आले असते. व suspension of judgement ची आवश्यकता उरली नसती. आणखी एक गोष्ट - तुम्ही श्रीमती अनुराधाबाईंच्या बाबतीत जे लिहिले आहे त्याला मी कधीच विरोध व्यक्त केलेला नाही. यापुढे जे लिहिणार असाल त्यालाही मी विरोध करणार नाही,

याची खात्री बाळगावी. मी स्वतःया case विषयी काहीच लिहिले नसल्याने माझ्या मताचा संबंध उद्भवत नाही.

माझ्या स्नेह्यांना साडीवर खड्डा पडल्यासारखे 'दिसले.' कदाचित तो दृक्भ्रम असू शकेल. मनात विशिष्ट ग्रह असला तर दृक्भ्रम होऊ शकतो. म्हणून तर camera ची साक्ष महत्त्वाची, आणि म्हणूनच तर video पाहण्याची इच्छा होती, आता ती आवश्यकता नाही.

माझ्या स्नेह्यांना खडा दिसल्याचे वाटल्याबरोबर तेथल्या तेथे बाईंना ex- pose का केले नाही? या प्रश्नाचे उत्तर म्हणजे, निमंत्रित या नात्याने गेलेल्याने असे काही करणे शिष्टाचाराचा भंग, अर्थात अशोभनीय वर्तन ठरले असते. प्रयोगाचे वेळी प्रयोगकर्ते जे करू शकतात, ते निमंत्रित व्यक्तीने करणे अयोग्य. आपल्या पत्राच्या पृष्ठ २ वरील प्रश्नाची उत्तरे वर लिहिलेल्या मजकुरावरून मिळावीत.

मसलेचौधरी येथे खडूची पेटी वगैरे कोणी सांगितले, ते डॉ. भरत देसाईंना आठवते का, हे त्यांना केव्हातरी विचारीन कळावे, लोभ असावा ही विनंती.

आपला, व. वि. अकोलकर

॥ ॐ ॥

अद्वयानंद गळतगे भोज (बेळगाव) १४ जून १९९४

सन्माननीय प्रा. व. वि. अकोलकर यांना, सा. न. वि. वि.

आपले ५ जूनचे पत्र मिळाले. प्रकृती बरी नसून आपण घेत असलेल्या कष्टाचे कौतुक वाटते. वास्तविक आपणाला त्रास देण्याची माझी बिलकुल इच्छा नाही. पण सत्यान्वेषणाची इच्छा गप्प बसू देत नाही. म्हणून हा पत्रप्रपंच.

श्रीमती अनुराधाबाईंच्या चमत्काराविषयी आपण जी संशयवादी भूमिका स्वीकारली आहे, त्याविषयी आपण केलेला खुलासा मला पूर्णपणे समाधानकारक - वाटला नाही. त्याची दोन प्रमुख कारणे -

(१) प्रयोगात्मक अथवा प्रयोगसदृश नियंत्रित प्रसंग मिळाला नाही, तोपर्यंत suspension of judgement ही भूमिका आपण व आपले इतर स्नेही यांनी) घेणे वावगे नाही हे आपले म्हणणे कोणीही मान्य करील. पण वस्तुस्थिती काय आहे? प्रा. डॉ. देसाई व प्रा. गायकवाड यांना पिंपरी येथे आपण कशासाठी पाठविले होते? तेथे 'प्रयोगसदृश' परिस्थिती नव्हती काय? जे काम दोन प्राध्यापकांकडून झाले नाही, ते व्हिडिओ कॅमेऱ्याने होते हे कसे पटेल? 'त्यांना निश्चित मत बनवण्याजोगी परिस्थिती नव्हती' हे आपले म्हणणे मोघम आहे. कोणती परिस्थिती पाहिजे होती? आणि पाहिजे त्या परिस्थितीचा त्या प्राध्यापकांनी तेथे आग्रह का धरला नाही? या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे हवीत. (माझ्यासमोर प्रयोगापूर्वी बाईंनी पाण्याने हातही धुतले आहेत. दिलेल्या पाण्याने हात धुण्याची त्यांची तयारी नेहमीच असते. आमच्या स्त्री-प्रतिनिधीपुढे कपडे बदलणे, प्रयोगाच्या वेळी दोन्ही मांड्यांवरून कापड घालणे इ. आमच्या अटी बाईंनी पाळल्या होत्या.)

(२) 'ज्या प्रकारचा प्रयोगसदृश प्रसंग हवा होता तसा प्रसंग कोल्हापूर येथे मिळाला व शेकडो जणांना विभूती मिळाली, असे १९ मे रोजी डॉ. सी. बी. देसाई यांनी सांगितले तेव्हा कळले.' हे आपले विधान दोन कारणांसाठी स्वीकारता येत नाही. एक, ते चुकीचे आहे. आणि दुसरे, ते पूर्णपणे शास्त्रीय नाही. ते चुकीचे आहे याचे कारण डॉ. सी. बी. देसाई यांनी शेकडो लोकांना मसलेचौधरी येथे विभूती मिळाली असे म्हटले, कोल्हापूर येथे मिळाली असे म्हटलेले नाही ही वस्तुस्थिती आहे. (याची आपण त्यांना पत्राने विचारून खात्री करून घेऊ शकता. माझ्याबरोबरच ते मसलेचौधरी येथे दुसऱ्या वेळी अमावस्येच्या दिवशी आले होते आणि तेथेच शेकडो लोकांना विभूती मिळाली. कोल्हापूर येथे अगदी थोडे (निवडक) निमंत्रित लोक होते. त्या थोड्यांना ती मिळाली.) हे विधान पूर्णपणे शास्त्रीय नाही, याचे कारण किती जणांना विभूती मिळते या गोष्टीवरून या चमत्काराची सत्यता ठरत नसून रिक्त हातांतून विभूती निघते की नाही हे ठरविण्यावर .त्याची सत्यता अवलंबून आहे. आपला पहिल्या गोष्टीवर भर दिसतो. ती गोष्ट या चमत्काराच्या सत्याला पूरक असली तरी त्याची सत्यता ठरविण्यासाठी सी निर्णायक ठरू शकत नाही. जेथे शेकडो लोक नाहीत तेथे या चमत्काराची सत्यताच ठरू शकत नाही, असे आपण म्हणणार काय?

आणि रिक्त हातांतून विभूती निघण्याची प्रक्रिया खरी आहे की ती हातचलाखी आहे हे ठरविण्यासाठी आपण काय दक्षता घेतली हे कोठेच स्पष्ट केलेले नाही; अथवा तसा प्रयत्न केल्याचे दिसत नाही. बिबवेवाडी येथे आपण किती लोकांना बाईंनी विभूती दिली हेच मोजत बसला होता असे आपणच म्हटले आहे. रिक्त हातातून विभूती निघण्याची प्रक्रिया genuine आहे का, या गोष्टीकडे आपण लक्ष दिल्याचे किंवा इतरांना त्यावर लक्ष ठेवण्यास सांगितल्याचे दिसत नाही. निदान ते आपल्या बोलण्यातून दिसून आले नाही.

या दोन प्रमुख कारणांमुळे आपले संशयवादी भूमिकेविषयीचे म्हणणे मला समाधानकारक वाटत नाही. या प्रकरणावर आपण काही लिहिलेले नाही व माझ्या या case च्या तपासणीला आपली मूक मान्यता आहे हे खरे असले तरी आपण माझ्या संशोधनापेक्षा किंवा डॉ. सी. बी. देसाई, प्रा. कृष्णा गुरव, प्रा. पां. ना. कुलकर्णी व करवीरपीठाचे शंकराचार्य विद्याशंकर भारती यांसारख्या जबाबदार लोकांच्या साक्षीपेक्षा अनुराधाबाईना खडूची पेटी दिली असे सांगणाऱ्या कोणा यःकश्चित दुकानदारावर त्याविषयी सांगोवांगी मिळालेल्या बातमीवर विश्वास ठेवून बाईंच्या चमत्काराच्या खरेपणाविषयी शंका घ्यावी, याचे मला आश्चर्य वाटते. समाजात प्रत्येक गोष्टीविषयी अफवा, संशय पसरविणारे लोक असतात. त्यांना आपल्यासारख्यांनी भीक घालावी हे आश्चर्य नव्हे काय? आपल्यासारख्या प्रथितयश परामानसशास्त्रज्ञाने 'बाप दाखव नाहीतर श्राद्ध कर' या धोरणाने वागावे, सांगोवांगी गोष्टींवर विश्वास ठेवता कामा नये, असा आग्रह धरणे आणि अपेक्षा बाळगणे चुकीचे होईल काय? साडीवर विभूतीचा खडा पडल्याचे पाहणाऱ्या व गप्प बसणाऱ्या आपल्या स्नेह्याचे समर्थन 'निमंत्रितांच्या शिष्टचारा'च्या किंवा 'दृकभ्रमा'च्या सबबींनी करावे याचेही आश्चर्य वाटते. सत्यशोधनाच्या आड कसलीही सबब येऊ वा चालू देऊ नये, अन्यथा या क्षेत्रात पडू देऊ नये असे वाटते. अशा कार्यक्रमांना 'भक्त' म्हणून जाण्यास कोणाचीही आडकाठी नाही.

आपला स्नेहांकित, अद्वयानंद गळतगे.